


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ६ : अंक १ : हिवाळा १९८८



अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर )
**संपादन–समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ (दूरध्वनी ५२००९)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर; पुणे ४११००१ ( दूरध्वनी ५६४४९, ५४०६९ )
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.
बदललेल्या दूरध्वनी-क्रमांकांची नोंद घ्यावी.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

# हेही एक संज्ञापनच !

" तुम्ही स्वतःचा फ्लॅट का घेत नाही ? " असं मला अनेकजण विचारतात. फ्लॅट-साठी माझ्याजवळ पैसे नाहीत ही वस्तुस्थिती आहे. पण मी त्यांना सांगतो, " अहो, मला फ्लॅट अजिबात आवडत नाही. कोणीतरी आखून दिलेल्या जागेत राहायचं, त्यात सोसायटीच्या कटकटी, शेजाऱ्यांच्या कटकटी ! त्यापेक्षा मी एखादा बंगलाच घ्यायच्या विचारात आहे. " माझं हे उत्तर ऐकून ते गप्प बसतात. मीही माझ्या या उत्तरावर खुश असतो.

मनातल्या मनात मी आपल्या भाषेचे आभार मानतो. आपल्या भाषेनं आपल्याला किती सोयी उपलब्ध करून दिल्या आहेत ! आपल्या मनातले विचार दुसऱ्याला कळव-ण्याचं भाषा हे उत्कृष्ट साधन आहे. इतर कुठल्याही साधनानं इतक्या परिपूर्ण तऱ्हेनं आपण आपल्या विचारांची अभिव्यक्ती करू शकत नाही. त्याचबरोबर भाषा हे आपले विचार किंवा भाव दुसऱ्यापासून लपवून ठेवण्याचंही साधन आहे. आपल्या भाषेचं हेच खरं वैशिष्टय आहे. पशुपक्ष्यांना आपले विचार अशा प्रकारे लपविता येत असतील का ?

आपल्या मनातले विचार आपण किती प्रकारांनी दडवू शकतो ? त्यातला एक ठळक प्रकार म्हणजे खोटं बोलण्याचा. त्याच्याही किती नाना तऱ्हा ! करून सवरून " आपण केलं नाही. " म्हणून सांगणं म्हणजे घडलेली वस्तुस्थिती नाकारणं. " मी तरुणपणी खूप कुस्त्या जिंकलेल्या आहेत. मोठमोठ्या पैलवानांना लोळवलं आहे. " असं काही घडलेलं नसतानाही सांगणं, " माझ्याजवळ आता पैसे नाहीत. असते तर मी तुला दिले नसते का ? " असं म्हणून वर्तमान वस्तुस्थिती नाकारणं, " आमच्या गावी आमची खूप मोठी शेती आहे, वाडे आहेत, नोकरचाकर आहेत " असं वस्तुस्थितीच्या विरुद्ध सांगणं, " मी निवडून आल्यावर यंव करीन, त्यंव करीन " अशी कधीही खरी न होणारी आश्वासनं देणं, इत्यादी. हे सगळे खोटं बोलण्याचेच प्रकार आहेत. समोरच्या व्यक्तीला अंधारात ठेवून आपण आपले काही स्वार्थी हेतू साध्य करीत असतो. म्हणून नैतिकदृष्ट्या ते काही क्षम्य ठरत नाहीत.

ज्याला खोटं म्हणता येणार नाही, पण मनातल्या विचारांपेक्षा वेगळी अभिव्यक्ती असलेले प्रकार राजकारणाच्या क्षेत्रात आढळून येतात. प्राध्यापक ग. प्र. प्रधानांनी **भाषा आणि जीवन**च्या उन्हाळा १९८५ च्या अंकामध्ये आपल्या ' राजकारणातील भाषा ' या लेखात राजकारणी लोकांच्या भाषेच्या अनेक गमतीजमती सांगितल्या आहेत. राजकारणी माणसांना सत्य सांगून, लोकांचा विश्वास गमवायचा नसतो. अशावेळी भाषेचा

पर्यायोक्तीच्या पद्धतीनं वापर करणं त्यांना श्रेयस्कर वाटतं. " वाटाघाटी फिसकटल्या " असं सांगण्याऐवजी " वाटाघाटी मैत्रीपूर्ण वातावरणात पार पडल्या. आम्ही पुन्हा भेटणार आहोत. " असं सांगणं जास्त सोयीचं ठरतं. समोरच्या माणसाची मागणी एकदम नाकारण्याऐवजी " बघतो, विचार करून सांगतो " हे सांगणं केव्हाही चांगलं.

इतर व्यवहारातही हे पर्यायोक्ताचे प्रकार आपल्याला खूप भेटतात. " आपलं काम अपुरं आहे " असं न सांगता " कामाची प्रगती चालू आहे " असं सांगण्याचा रिवाज आहे. आपण नापास झालो हे सांगण्यात कमीपणा वाटतो तेव्हा, " आमच्या वर्गातले खूपजण नापास झाले " असं सांगतो. नोकरी मागण्यासाठी आलेल्या उमेदवाराला मुलाखतीनंतर नकाराऐवजी " आम्ही तुम्हांला कळवू " असंच सांगितलं जात असतं.

समोरच्या माणसाला दुखवायचं नाही यासाठी आणखी काही पर्यायांचा वापर व्यवहारात करावा लागतो. एखाद्याला " तुझं पुस्तक भिकार आहे " असे कोणी तोंडावर सांगत नाही. त्याऐवजी " पुस्तक अगदी देखणं झालंय हो. त्याची बांधणी, छपाई अगदी उत्कृष्ट आहेत. " असं सांगणं परवडतं. घरी आलेल्या पाहुण्यांची मुलं खूप खोड्या करत असली, तर " मुलं अगदी खेळकर आहेत हो तुमची " असं म्हणून राग गिळायचा असतो.

आणखी एक रास्त मार्ग म्हणजे कटू प्रसंगाला तोंड देत बसण्यापेक्षा काहीतरी सबब सांगून सटकणं. दोघांच्या भांडणात आपली साक्ष कुणी काढायला लागलं, की " मला काही आठवत नाही बुवा " असं सांगणं सुज्ञपणाचं नाही का ? इसापनीतीतल्या कोल्ह्यानं नाही का पडशाची सबब सांगून सिंहाच्या तावडीतून स्वतःची सुटका करून घेतली ! " अश्वत्थामा मेला हे खरं, माणूस की हत्ती ते मला माहीत नाही बुवा " हे धर्मराजाचं उत्तर म्हणजे हे या प्रकारचं गाजलेलं उदाहरण.

मनातले विचार जसेच्या तसे बोलून दाखवणं याला सत्यवक्तेपणा म्हणत असतील तर तो काही नेहमीच प्रशंसनीय गुण ठरेल असं वाटत नाही. अशा ' स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग ' कसे अंगलट येतात हे चिं. वि. जोशांनी चांगलं दाखवून दिलं आहे. त्यापेक्षा त्या सत्याला थोडीशी मुरड घालून एकमेकांची अंतरं राखायला भाषेची मदत होते.

पण हे भाषिक सौजन्य कधी फसवं असतं. " चित्राची फ्रेम किती चांगली आहे नाही ! " हा चित्र किती भिकार आहे हे आडून तुच्छता दाखवण्याचंच कसब असू शकतं. सौजन्याचा फक्त पापुद्राच ! ही कला किती पूर्णत्वाला पोचू शकते याचे नमुने आपल्याला द. पां. खांबेटे यांनी आपल्या ' बायकांची भाषा ' या **भाषा आणि जीवनच्या** दिवाळी १९८४ च्या अंकात पुनर्भेटीस आलेल्या लेखात चांगलेच दाखवून दिले आहेत. वार इतक्या सफाईनं मारलेला की रेषाही दिसू नये !

**कल्याण काळे**

# मराठीतून राज्यशास्त्र : दोन प्रयत्न

सुहास पळशीकर

पदवी–पातळीपर्यंत राज्यशास्त्र हा विषय मराठीमधून शिकवण्याची–शिकण्याची प्रथा (मुंबईचा अपवाद वगळता) सर्वत्र रूढ झाली आहे. पदव्युत्तर पातळीवरही परीक्षार्थींना मराठीतून उत्तरे लिहिण्यास परवानगी मिळू लागली असून, हळूहळू संशोधनपर लेखनही मराठीतून होऊ लागेल. अशा परिस्थितीत साहजिकच राज्यशास्त्रातील शास्त्रीय स्वरूपाच्या संज्ञा–संकल्पना मराठीत आणणे हे क्रमप्राप्त ठरते. या दिशेने अगदी प्रथम प्रयत्न केले, ते पदवी–पातळीवरची राज्यशास्त्राची क्रमिक पुस्तके मराठीतून लिहिणाऱ्या लेखक–अध्यापकांनी. ह्या असंघटित प्रयत्नांनी बरेच पारिभाषिक पर्याय (काही चूक, काही बरोबर) एव्हाना प्रचलित झाले आहेत. त्यानंतर विद्यापीठीय पातळीवरही काही ठिकाणी पारिभाषिक पर्याय तयार करण्याचे काम झाले. तरीही ह्या प्रयत्नांनंतरही परिभाषेविषयी काहीशी गोंधळाची परिस्थिती कायमच राहिली. एका पुस्तकात विशिष्ट इंग्रजी संज्ञेसाठी वापरलेला पर्याय दुसऱ्या पुस्तकात दुसऱ्याच एखाद्या शब्दासाठी असावा किंवा एखादा मराठी पर्याय महाराष्ट्राच्या एका भागात प्रचलित असावा पण दुसऱ्या भागात अनाकलनीय वाटावा, हा प्रकार अद्यापही चालू आहे.

शासकीय पातळीवर १९६७ पासून मराठी परिभाषा तयार करण्यास चालना मिळाली. यथावकाश राज्यशास्त्राची परिभाषा तयार करण्यासाठी प्रत्येक विद्यापीठाच्या एकेका प्रतिनिधीची मिळून एक समिती तयार झाली आणि तिने राज्यशास्त्राचा परिभाषाकोश तयार केला. अलीकडेच म्हणजे जानेवारी १९८७ मध्ये हा कोश प्रसिद्ध झाला. [१]

तत्पूर्वीच म्हणजे १९८४ पासून आम्ही काही मित्र काहीशा याच प्रकारच्या कामात मग्न होतो. मराठी पर्यायांचा शोध हा आमच्या कामाचा एक भाग होता. राज्यशास्त्राचा मराठीतून होणारा अभ्यास शास्त्रशुद्ध आणि सुप्रतिष्ठित कसा होऊ शकेल, याचा विचार करीत असताना, निव्वळ पर्याय शोधण्यापेक्षा राज्यशास्त्रातील संकल्पनांचा संक्षिप्त परिचय मराठीतून करून द्यावा, या हेतूने राज्यशास्त्रकोश

१. **राज्यशास्त्र परिभाषा कोश**, भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९८६, ११८ पृष्ठे, मूल्य रु. १४.००.

तयार करण्याचे आम्ही ठरविले. कोशाच्या आराखड्याची मांडणी राजेंद्र व्होरा, मी, यशवंत सुमंत, आणि संजय पळशीकर अशा चौघांनी मिळून केली आणि डॉ. व्होरा आणि मी, आम्ही दोघांनी पुढचे संपादकीय सोपस्कार केले.[२] हे सर्व विस्ताराने येथे सांगण्याचे कारण एवढेच की पारिभाषिक पर्यायांची गरज कोणत्या इंग्रजी संज्ञांच्या बाबतीत आहे, कोणते पर्याय प्रचलित आहेत, आणि त्यांचा परिचय कसा करून द्यावा, ह्या प्रश्नांची उत्तरे आम्हीही आपल्या परीने शोधीत होतोच. साहजिकच राज्यशास्त्राची परिभाषा हा गेली काही वर्षे आमच्या जिव्हाळ्याचा विषय बनला आहे.

त्यामुळेच महाराष्ट्र शासनाच्या भाषा संचालनालयाने तज्ज्ञसमितीच्या मदतीने तयार केलेला परिभाषा कोश प्रसिद्ध झाल्याचे वृत्त वर्तमानपत्रात वाचले, तेव्हा तिकडे चटकन आकर्षित झालो. दुर्दैवाने हा कोश प्रसिद्ध झाला, तेव्हा आमचा कोश छपाईसाठी गेला होता. त्यामुळे शासनाच्या परिभाषाकोशाचा उपयोग करणे शक्य नव्हते.

१

शासनाचा **राज्यशास्त्र परिभाषा कोश** आणि आमचा **राण्यशास्त्र शब्दकोश** ह्यांचे स्वरूप आणि व्याप्ती अगदी भिन्न असली, तरीही अशा प्रकारच्या कामात येणाऱ्या अडचणी, त्यात राहणाऱ्या त्रुटी यांच्यांत बरेचसे साधर्म्य असल्याने त्या दोहोंचा एकत्र विचार या लेखात केला आहे. अर्थातच मनुष्य-स्वभावाला साजेशा पद्धतीने येथेही शासनाच्या कोशातील उणिवांचेच अधिक ठळकपणे विवेचन केले असून ह्या प्रमादाची भरपाई म्हणून आमच्या कोशाचे आत्मसमर्थन टाळून फक्त अनुभव-कथनच करण्याचे ठरविले आहे !

**राज्यशास्त्र परिभाषा कोशात** 'सुमारे ५००० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय दिले आहेत. एकशेअठरापानी कोशाला तज्ज्ञ समितीने वेगळी प्रस्तावना जोडलेली नसल्यामुळे पर्याय ठरविताना आणि इंग्रजी शब्द निवडताना कोणती भूमिका होती, ह्याचा पुरेसा अंदाज येत नाही. पर्याय ठरविण्यासाठी 'भाषा सल्लागार मंडळा'ने काही 'निर्देशक तत्त्वे' ठरवून दिली आहेत, त्यांवरून पर्यायविषयक भूमिका लक्षात येते. पण मुळात कोणत्या इंग्रजी शब्दांचे पर्याय देणे आवश्यक आहे. हे ठरविण्यामागची भूमिका मात्र प्रत्यक्ष निवडलेल्या शब्दांवरूनच ठरवावी लागते.

आपण प्रथम पर्यायांची चर्चा करू. सर्वसाधारणपणे ह्या परिभाषाकोषातील पर्यायांचा दर्जा समाधानकारक आहे. 'तुपाआधी तोफा' (guns before butter)

---

२. **राज्यशास्त्र शब्दकोश,** राजेंद्र व्होरा, सुहास पळशीकर (संपा.) दास्ताने रामचंद्र आणि कं. पुणे १९८७.

किंवा ' शिरशिकार ' (head hunting) असे अगदी शब्दशः पर्याय देतानाही आकर्षक, प्रासप्रचुर पर्याय दिले आहेत, ही कोशकर्त्यांच्या भाषालालित्याची साक्षच म्हटली पाहिजे. परिभाषा तयार करताना भेडसावणारी अडचण इथे सहज लक्षात येते. निव्वळ शब्दशः पर्याय द्यावेत, की त्यातील अर्थानुसार द्यावेत ? उदाहरणार्थ, ' तुपाआधी तोफा ' म्हणजे युद्धसाहित्यावरील खर्चाला प्राधान्य हे थोडचाशा प्रयत्नाने कळते. पण ते विनासायास कळावे, म्हणून ' शस्त्रसज्जतेला प्राधान्य ' किंवा ' युद्धखोर धोरण ' अशासारखा पर्याय द्यावा, की एकच पर्यायरूपी शब्द न देता सरळ स्पष्टीकरणवजा प्रदीर्घ शब्दसमुच्चय द्यावा ? परिभाषाकोशात सामान्यपणे सुटसुटीत, आटोपशीर पर्याय देण्याचे धोरण अंगीकारले आहे. साहजिकच काही ठिकाणी पर्याय आटोपशीर, चटपटीत दिसतात; पण त्यांचा अर्थ सहजगत्या वाचणाऱ्यापर्यंत पोचत नाही. उदा., अटलांटिक राष्ट्रसमुदाय (अटलांटिक कम्यूनिटी) हा पर्याय म्हणजे काय आहे ? सामान्य विद्यार्थ्यांच्या दृष्टीने अटलांटिक कम्यूनिटी आणि अटलांटिक राष्टसमुदाय ह्या दोहोंचा अर्थ सारखाच अवघड आहे. म्हणजे मराठी पर्याय आल्याने विषय सोपा–सुगम होण्याचे उद्दिष्ट कितपत साध्य होणार ? तसाच ' तृणमुळी लोकशाही ' ( grassroots democracy) हा शब्द पाहा. भांडवलशाही, लोकशाही, उदारमतवादी लोकशाही तसाच हा काही प्रकार आहे काय ? अशा परिस्थितीत शब्दशः पर्याय देण्यापेक्षा लक्ष्यार्थसूचक अर्थवाही पर्याय देणेच अधिक उपयुक्त ठरेल असे वाटते. शब्दशः पर्याय देण्याचे एक टोकाचे उदाहरण पाहू. अमेरिकेचे सर्वोच्च न्यायालय विधिमंडळाने केलेले कायदे घटनाबाह्य असल्याचे ठरवून रद्दबातल करू शकते. साहजिकच त्या न्यायालयाच्या न्यायाधीशांवर विविध प्रकारची टीका केली जाते. त्यांचा ' nine old man ' असा निर्भर्त्सनावजा उल्लेख अपशब्दप्रेमी अमेरिकी राजकारणी आणि चटकदार भाषेचे प्रेमी स्तंभलेखक करतात. ह्यातील ' old ' शब्दाला कारण आहे ते दुहेरी. प्रौढ वयात सर्वोच्च न्यायालयात नेमणूक झालेले न्यायाधीश निवृत्तिवयाची अट नसल्यामुळे वृद्धापकाळीही पदावर राहतात हे एक आणि रुझवेल्ट अध्यक्ष असताना सर्वच न्यायाधीश वयस्कर होते आणि त्यांच्या बहुमताने रुझवेल्ट ह्यांना हैराण केले होते. हे दुसरे. आता ही सर्व पार्श्वभूमी पर्यायी शब्दांत येणेच मुळात कठीण आहे हे खरे; पण त्यामुळे ' सुप्रीम कोर्टातील नऊ बुढ्ढे ' ह्या पर्यायाचे कितपत समर्थन होऊ शकेल ह्याविषयी शंकाच आहे !

काही शब्दांना किंवा वाक्प्रचारांना विशिष्ट संदर्भात विशिष्ट अर्थ प्राप्त होतो, अन्यथा त्यांना वेगळा अर्थ असतो. राज्यशास्त्राची परिभाषा तयार करताना राज्यशास्त्राच्या संदर्भात असलेला अर्थच देणे आवश्यक आहे. अन्य अर्थ आणि पर्याय परिभाषा कोशात येण्याचे काहीच कारण नाही. पण राज्यशास्त्र परिभाषा कोशात

मात्र अन्य संदर्भातील अर्थ दिलेले आहेत आणि कित्येक ठिकाणी असे पर्याय प्रथम येतात आणि मग राज्यशास्त्रीय पर्याय येतो. त्यादृष्टीने landslideकिंवा watershed हे शब्द पाहण्यासारखे आहेत. Landslide ला पहिला पर्याय आहे भूमिपात असा आणि watershed चा पर्याय दिला आहे चक्क जलविभांजक हा! म्हणजे पुन्हा शब्दशः अर्थ देण्यावरच भर दिसून येतो. पण त्यामुळे भूमिपात आणि जलविभाजक यांचे राज्यशास्त्रात नक्की अर्थ (आणि स्थान) कोणते हे कोडे तसेच राहणार! निवडणुकीच्या संदर्भात landslide victory असा शब्दप्रयोग केला जातो. तेथे 'भूमिपात' कामाचा नाही. त्यामुळे 'प्रचंड विजय' असा पर्याय दिला आहे, आणि watershed election म्हणजे 'ऐतिहासिक निवडणूक' असा पर्याय दिला आहे. ह्या पर्यायांवरूनच प्रथम दिलेल्या पर्यायांची मर्यादा आणि अनावश्यकता पुरेशी स्पष्ट होते.

ह्या उलट काही ठिकाणी अन्वर्थक आणि उपयुक्त पर्यायही ह्या कोशात दिलेले आहेत त्यांपैकी मला विशेषत्वाने जाणवलेले काही पर्याय मुद्दाम नमूद करतो, म्हणजे आपोआपच वरील पर्यायांमधील दोष लक्षात येईल. राज्यघटना दुरुस्त करणे (तिच्यात काही बदल करणे) कितपत कठीण अथवा सोपे आहे त्यावरून rigid आणि flexible असे दोन प्रकार पाडले जातात. सामान्यपणे त्यांचे ताठर/परिदृढ आणि परिवर्तनीय/लवचीक असे अनुक्रमे भाषांतर केले जाते. त्याऐवजी ह्या परिभाषा कोशाने अनुक्रमे दुष्परिवर्तनीय आणि परिवर्तनसुलभ असे सुटसुटीत आणि अधिक अर्थपूर्ण पर्याय दिले आहेत. तसेच utopia या शब्दाला दिलेला 'कल्पितादर्श' हा पर्यायही आकर्षक आहे. त्यावरूनच utopian socialism ह्या शब्दाला 'कल्पितादर्शी समाजवाद' हा जो पर्याय दिला आहे, तो मात्र पुन्हा शब्दशः पर्यायाचे उदाहरण ठरतो. कारण 'युटोपियन' समाजवाद असा ओवेन आदींच्या विचाराचा मार्क्सने काहीसा हेटाळणीवजा उल्लेख करून आपला समाजवाद 'शास्त्रीय' असल्याचा दावा केला आहे. त्यामुळे युटोपियनला येथे अशास्त्रीय –वास्तवाचे भान सुटलेला– असा अर्थ प्राप्त होतो. तो 'कल्पित-आदर्शवादी' ह्या शब्दांत पुरेसा व्यक्त होत नाही. आम्हीही या शब्दापाशी अडखळलो होतो. 'अशास्त्रीय समाजवाद' म्हणावे, असे वाटत होते. प्रत्यक्षात आम्ही उसनवारी करून आचार्य जावडेकरांनी वापरलेला 'भावनामय समाजवाद' हा पर्याय स्वीकारला.

शब्दशः पर्यायांची आणखी काही मासलेवाईक उदाहरणे पाहण्यासारखी आहेत. कारण त्यातून सरळ सरळ चुकीचा अर्थ ध्वनित होतो. कायदा आणि न्यायशास्त्रातील double jeopardy ही एक संज्ञा आहे. एकाच गुन्ह्यासाठी दोनदा खटला चालणे असा त्याचा अर्थ असून ही पद्धत न्यायतत्त्वाच्या विरुद्ध मानली जाते. त्याला परि-

भाषाकोशात पर्याय आहे 'दुबार धोका.' त्यातून काहीच अर्थबोध होण्याची शक्यता नाही. तीच गत insubordination ह्या शब्दाची. त्याला पर्याय दिले आहेत 'शिरजोरी, बेमुर्वतखोरपणा' शब्दशः साधारणपणे हाच अर्थ आहे. पण प्रशासनशास्त्रात त्याला विशिष्ट अर्थ आहे. मी समोरच्या माणसाशी शिरजोरीने—आगाऊपणे—वागलो, तर त्याला काही insubordination म्हणत नाहीत. ती संज्ञा प्रशासन—व्यवहारात पदाच्या मर्यादा सोडून, अधिकारातिक्रमण करून वर्तन करणे ह्या अर्थी वापरली जाते. त्यामुळे शिरजोरी हा पर्याय खटकतो. ह्याहून अधिक गोंधळ idealism चा झाला आहे. त्याला आदर्शवाद, ध्येयवाद आणि idealist म्हणजे आदर्शवादी असे पर्याय दिले आहेत. प्रत्यक्षात idealism ही विशिष्ट तत्त्वप्रणाली असून तिचा ideal म्हणजे आदर्श—ध्येय वगैरेशी संबंध नाही. त्याला 'चिद्वाद' हा पर्याय प्रचलितही आहे. त्यामुळे ह्या परिभाषाकोशात 'आदर्शवाद' कोठून आला कोणास ठाऊक !

अशी आणखी अनेक उदाहरणे देता येण्यासारखी आहेत. प्रशासनशास्त्रातील 'line agency'ला 'तती अभिकरण', 'confrontation' ला 'समोरासमोर आणणे', 'रुजू मुकाबला', 'escape clause' ला 'सुटका/विमोचन खंड', 'gag law' म्हणजे 'मुस्कटदाबी कायदा' इत्यादी अनेक संज्ञांसाठी निव्वळ प्रतिशब्द देण्यापेक्षा अधिक अर्थवाही पर्याय आवश्यक आहेत, असे वाटते.

अशा प्रकारे ज्या ठिकाणी अधिक सुबोध पर्याय असायला हवे होते अशा संज्ञांची एकूण संख्या शंभराच्या आसपास असावी. कोशातील एकूण संज्ञांपैकी सुमारे एक-पंचमांश संज्ञा मुळातच अनावश्यक आहेत, (ह्या मुद्द्याचे विवेचन पुढे केलेच आहे.) म्हणजे वादग्रस्त पर्यायांचे प्रमाण खूपच अल्प आहे. तरीही मी त्यांचा सविस्तर विचार करतो आहे, याचे कारण शासनाने तज्ज्ञ समितीकरवी तयार केलेल्या पर्यायांवर अधिकृतपणाचे शिक्कामोर्तब होण्याची बरीच शक्यता असते. दुसरे असे, की दोषपूर्ण पर्यायांची संख्या मर्यादित असली, तरी त्यामुळे होणारी संभाव्य हानी कमी ठरत नाही.

आता बव्हंशी चुकीचे पर्याय दिलेल्या संज्ञा पाहू या. मला पहिल्याच पानावरील absenteeismचा 'अनुपस्थिति पद्धति' हा पर्याय खटकला. कारण जमीनदारीच्या संदर्भात तो पर्याय योग्य ठरतो. पण कामगारांच्या वारंवार अनुपस्थित राहण्याच्या संदर्भात अपुरा ठरतो. तसेच activist हा शब्द सक्रिय राजकारण्यांना अनुलक्षून वापरला जातो. त्यामुळे 'क्रियावादी' ह्या पर्यायापेक्षा 'क्रियाशील' अधिक योग्य वाटतो. anomie साठी 'अतिचार' हा पर्याय दिला आहे. त्यापेक्षा 'मूल्यविहीनता' जास्त सोपा ठरेल. integrity साठी वापरलेला 'दानत' पर्याय चुकीचा वाटतो त्याऐवजी 'सचोटी' हवा. अशाच प्रकारे असैनिक/मुलकी (civilian) प्रकरण,

व्यक्तीअभ्यास (case study method), हिटलरशाही (Hitlerism), समूह-मनस्क (mass-minded), इ. पर्यायही अयोग्य वाटतात. त्याखेरीज New left म्हणजे निर्नायकी आंदोलन आणि redundance म्हणजे खैरात पद्धती, ह्या चुका अनाकलनीय वाटतात. admiralty चा अर्थ एकतर ब्रिटीश नौदल कार्यालय असा होतो किंवा नौनिधि न्यायालय; पण येथे 'नौसेनापतिपद' असा पर्याय येतो. antifederalist नावाचा गट अमेरिकेत घटना तयार केली गेली तेव्हा होता. तो फेडरॅलिस्टांच्या वासाहतिक ऐक्याच्या विरुद्ध म्हणून 'अँटी–फेडरलिस्ट'. त्याचा 'संघराज्यवाद विरोधी' हा पर्याय त्यामुळेच काहीसा घोटाळा करणारा वाटतो.

राष्ट्रीय परिभाषेशी साधर्म्य राखण्यासाठी काही ठिकाणी एकदम हिंदी पर्याय दिलेले आहेत. उदा., आणीबाणीला 'आपातस्थिती' असा पर्याय दिला आहे. तसेच expiration साठी 'अवसान' असा पर्याय दिला आहे. ह्याउलट air to air missile साठी थेट 'आकाशात् आकाश...' असा संस्कृत पर्याय येतो. अमेरिकेच्या सेनेटमधील सभासदांचा प्रदीर्घ भाषण करण्याचा (आणि पर्यायाने कामात विघ्न आणण्याचा) अधिकार म्हणजे फिलिबस्टर. त्याला 'भाषणी अडवणूक' असा बहुधा व्याकरणशुद्ध (तृतीया विभक्ती ?) पर्याय येतो. पण त्याने अर्थबोध होतो काय, याविषयी शंकाच आहे. एकीकडे ही व्याकरणनिष्ठा तर दुसरीकडे appellate साठी अपीलीय असा इंग्रजी-मराठी रूपसंकरही आढळतो. व्याकरण, भाषाशुद्धी, आणि पर्यायांची सुगमता यांचा मेळ साधताना किती कसरत करावी लागते, ते ह्या उदाहरणांनी पुरेसे स्पष्ट व्हावे.

अशीच अडचण administrative आणि constitutional यांचे पर्याय देताना झाली आहे. Administrative म्हणजे प्रशासकीय आणि प्रशासनिक असे दोन पर्याय दिले आहेत. त्यानुसार administrative decision म्हणजे काय ? निर्णयाचे स्वरूप administrative आहे, की निर्णयाचा कर्ता प्रशासक आहे ? प्रशासकाने निर्णय घेतला, म्हणून 'प्रशासकीय' म्हणायचे ? की निर्णयाचे स्वरूप पाहून 'प्रशासनिक' म्हणायचे ? व्यवहारात सामान्यपणे administrative साठी 'प्रशासकीय' हाच शब्द रूढ आहे. पण परिभाषाकोशाच्या कर्त्यांना हा पेच सुटलेला नाही. त्यांनी अनेक ठिकाणी प्रशासकीय आणि प्रशासनिक हे दोन्ही विकल्प दिले आहेत. त्याऐवजी जेथे प्रशासकांचा संदर्भ आहे (वर्तन, सचोटी इ.) तेथे 'प्रशासकीय' आणि जेथे प्रशासकांच्या संरचनेचा म्हणजे 'प्रशासन' गटाचा संदर्भ आहे, तेथे प्रशासनिक ऐवजी 'प्रशासनाचे–ची' असा पर्याय वापरता आला असता, असे सुचवावेसे वाटते. ह्या पद्धतीने 'प्रशासकीय वर्तन', 'प्रशासकीय कार्यक्षमता', 'प्रशासनाचे राजकारण', 'प्रशासनाची प्रक्रिया', 'प्रशासनाची गुप्तता' असे अनेक पर्याय देता आले असते.





अनुक्रमणिका

तसेच ‘constitutional’ साठी कोणता पर्याय द्यावा ? constitution ला परिभाषाकोशाने संविधान हा प्रथम पर्याय आणि राज्यघटना हा दुसरा पर्याय दिला आहे. दुसरा पर्याय स्वीकारला, तर साहजिकच घटनात्मक, सनदशीर असे constitutionalचे रूप होते. पण संविधानचे रूप ‘संविधानिक’ करावे, की ‘संविधानी’ की ‘संविधानीय’? ह्या कोशात ही तिन्ही रूपे कधी आलटून पालटून तर कधी परस्परांचे विकल्प म्हणून येतात. ‘राजकीय घडण ठरविते, ती राज्यघटना’ असे म्हटल्यास राज्यघटना हाच पर्याय योग्य ठरतो आणि तो स्वीकारल्यास ‘संविधान’जन्य रूपांची तारांबळ करण्याचे वाचते. मात्र हिंदीत ‘संविधान’ हाच पर्याय आहे, हेही लक्षात ठेवले पाहिजे. अर्थाचा सोपेपणा अधिक वापरातील शब्द आणि आनुषंगिक रूपे करण्याची सोय या निकषांच्या आधारे आम्ही ‘राज्यघटना’ हाच पर्याय आमच्या कोशात स्वीकारला. (मात्र आमच्या लेखकमित्रांमध्येही एक ठाम ‘संविधान’वाला होताच. त्याचे हस्तलिखित दुरुस्त करता करता दमछाक झाली; हा भाग वेगळा !)

**राज्यशास्त्र परिभाषा कोशा**तील मला खटकलेल्या काही पारिभाषिक पर्यायांचा आतापर्यंत उल्लेख केला. व्याकरणाच्या मुद्द्यांच्या आधारे आणखीही काही पर्यायांबद्दल मतभेद व्यक्त करता येतील. पण मी प्रारंभीच म्हटल्याप्रमाणे सामान्यपणे पर्यायांचे स्वरूप चांगले आहे. वादग्रस्त आणि शंकास्पद पर्यायांबद्दल बोलायचे, तर मी असे म्हणेन, की त्यावरून परिभाषानिर्मितीचे काम किती जिकिरीचे आहे, हेच स्पष्ट होते.

अशी भाषांतरित परिभाषा का निर्माण करावी लागते ? एखादी ज्ञानशाखा परभाषेच्या लेखकांनी विकसित केलेली असते. आपण त्या ज्ञानशाखेचे नुसतेच ग्राहक असतो. तत्त्वे, मूल्ये, सिद्धांत आणि संकल्पना अशा चौफेर पातळीवर त्या ज्ञानशाखेचा परभाषेत विकास झालेला असतो. आता राज्यशास्त्राचेच पाहा. राजकारण हा त्याचा अभ्यासविषय असे ढोबळपणे म्हणू यात. तर ते राजकारण सर्वच समाजामध्ये आहे. पण त्याला शास्त्रशुद्ध चिकित्सा–विश्लेषणाचा विषय मानून त्यावर परभाषेतील–परदेशातील तज्ज्ञांनी चिंतन–लेखन केले. ते स्वीकारायचे किंवा नाकारायचे तर त्यांच्या सिद्धांतांचे–संकल्पनांचे मूल्यमापन केले पाहिजे. म्हणजेच ते मुळात अभ्यासले पाहिजे. स्वाभाविकच ज्या संकल्पना मुळात आपल्या भाषेत नव्हत्याच, त्या आणायच्या. हे काम नक्कीच अवघड आहे. उदाहरणार्थ, भिन्न स्वरूपाच्या अर्थव्यवस्थांचा किंवा राज्यव्यवस्थांचा एकाच दिशेने विकास होतो, हा सिद्धांतच मुळी परभाषेत मांडला गेला. त्यामुळे convergence theory चे मराठी रूप ठरवताना इंग्रजी शब्दांचे अर्थ कळत असूनही ते मराठीतून अभ्यासणाऱ्यांपर्यंत पोहोचविणे कठीण जाते. आम्ही आमच्या कोशात त्याला ‘समीपतेचा सिद्धांत’

म्हटले आहे. परिभाषा कोशात त्याला 'एककेंद्राभिमुख सिद्धांत' म्हटले आहे. ते 'एककेंद्राभिमुखतेचा सिद्धांत' असे हवे होते. पण मला असे वाटते, दोन्ही पर्यायांनी सिद्धांताचा गर्भितार्थ काही वाचणाऱ्यांपर्यंत पोचणार नाही. हीच मला वाटते अशा परिभाषेची अपरिहार्य मर्यादा आहे. पारिभाषिक पर्याय हे शब्दांचे सांगाडे आहेत. त्यांच्यांत अर्थवाहित्व यायचे, तर त्यासाठी शास्त्रीय परिभाषेचा अर्थ अभ्यासकांपर्यंत पोहोचून मग परिभाषा प्रचारात यायला हवी. तोपर्यंत convergence theory म्हणा किंवा 'एककेंद्राभिमुख सिद्धांत' म्हणा; दुर्बोधतेची पातळी एकच राहणार. दोन्ही सारखेच अनाकलनीय शब्द. एक इंग्रजी आणि एक मराठी एवढेच.

सारांश, ह्या सर्व मर्यादा आणि प्रत्येक भाषेची स्वतःची खास वैशिष्टचे लक्षात घेता परिभाषा तयार करण्याचे काम अवघड आहे. ते खूपशा समाधानकारकरीत्या परिभाषाकोशात केले आहे. मात्र असे असूनही ह्या कोशाचे मी मोकळेपणाने स्वागत करणार नाही. त्याचे कारण त्यातील उपर्युत त्रुटी किंवा वादस्थळे राहणे हे नव्हे. त्यांपैकी अनेक वादस्थळे राहणे क्रमप्राप्तच आहे; पण ह्या परिभाषाकोशाने अनेक ठिकाणी राज्यशास्त्राची मर्यादा सोडून 'शहाणे करून सोडावे सकळ जन' ह्या हेतूने प्रेरित होऊन अन्य क्षेत्रातील संज्ञांचे आणि साध्या इंग्रजी शब्दांचेही पर्याय दिले आहेत. ह्या परिभाषाकोशाशी माझा वाद खरेतर याच मुद्द्यावर आहे.

## २

ह्या कोशात स्वीकारलेल्या संज्ञा, त्यांचे पारिभाषिक पर्याय देताना पाळलेला क्रम आणि गाळलेल्या संज्ञा यांचा जर एकत्रितपणे विचार केला' तर ह्या परिभाषा कोशाचा उपयोग करणाऱ्यांना राज्यशास्त्राचे विपर्यस्त आकलन होईल, असे म्हणावे लागते. राज्यशास्त्र ह्या विषयाशी संबंध नसलेल्या संज्ञांची ह्या कोशात भरताड आहे.[३] अशा असंबद्ध संज्ञांमध्ये काय असेल याचा काही नेम नाही. म्हणजे त्यात विवाहविषयक आणि नातेसंबंधविषयक मानववंशशास्त्रीय संज्ञा आहेत, कायदा आणि न्यायशास्त्र या क्षेत्रांतील भरपूर संज्ञा आहेत, शासनव्यवहारातील शब्द आणि शासकीय पदाधिकारी यांच्याशी संबंधित संज्ञा आहेत, वृत्तपत्रीय स्तंभलेखनातील पोकळ पण आकर्षक वाक्प्रचार आहेत, आणि सामान्य इंग्रजी शब्दही आहेत. ह्या सर्वांच्या भाऊगर्दीत अधूनमधून राज्यशास्त्राचेही शब्द आहेत. असे होण्याचे मला तरी वाटते एकच कारण संभवते आणि ते म्हणजे राज्यशास्त्र ह्या विषयाचे स्वरूप आणि व्याप्ती याविषयीचा अगदी भिन्न विचार.

---

३ ह्या संदर्भातील माझ्या आक्षेपांचा मी अन्यत्र संक्षेपाने उल्लेख केला आहे. पहा : राज्यशास्त्रावर अन्याय करणारा राज्यशास्त्र परिभाषा कोश, **महाराष्ट्र टाइम्स**, २४ मे १९८७.

कोशकर्त्यांना जे राज्यशास्त्र अभिप्रेत आहे, ते काय आहे ? तर ते कायदा आणि राज्यशास्त्र आहे. न्यायालयीन कामकाज, कायदा, कायद्याची प्रक्रिया यांविषयीच्या झाडून साऱ्या संज्ञा येथे हजेरी लावतात. त्यामुळेच affidavit, approver, assignment, brief, confession, incriminate, indemnity ह्यांसारखे शब्द परिभाषाकोशात शिरकाव करते झाले आहेत. त्याचप्रमाणे सर्व नातेसंबंधविषयक शब्दही त्यांच्या कायद्याशी असलेल्या साहचर्यामुळेच आले असावेत. कायदा आणि राज्यशास्त्र ह्यांच्या सीमा वेगळ्या करणे आणि कायद्यातले राज्यशास्त्राशी संबंधित शब्द ठरविणे हे काही फार कठीण काम नव्हे. तरीही कायदेविषयक शब्दांचा इतका मोकळा वावर ह्या कोशात होतो, कारण कोशकर्त्यांच्या मते ते शब्द राज्यशास्त्राचाच भाग असणार, हे उघड आहे. म्हणूनच will ला प्रथमपर्याय 'मृत्युपत्र' हा येतो आणि 'ईहा' हा पर्याय (बिचारा) मागाहून येतो ! आपण ज्या विषयाचा परिभाषा कोश करतो आहोत, त्याच्याबद्दलची ही अनास्था खरोखरीच आश्चर्यकारक आहे. 'interest' ला 'व्याज' हा प्रथम पर्याय देणारा कोश राज्यशास्त्राचा म्हणायचा कसा, हा माझ्यापुढील प्रश्न आहे !

कायद्याखेरीज येतात, ते शासनव्यवहारातील भाराभर शब्द. येथेही पुन्हा मतभेदाचा मुद्दा राज्यशास्त्राच्या स्वरूपाविषयीच आहे. प्रशासनव्यवहारांचे शास्त्रीय विवेचन प्रशासनशास्त्रात केले जाते. राज्यशास्त्र आणि प्रशासन यांच्या संबंधांविषयी भिन्न मतप्रवाह आहेत. प्रशासन हे स्वतंत्र शास्त्र आहे असे मानले, तर राज्यशास्त्राच्या परिभाषा कोशात प्रशासनविषयक मोजकेच शब्द येतील. पण ह्या कोशात तर प्रशासनविषयक संज्ञा इतक्या आहेत, की कोशकर्त्यांच्या मते प्रशासन हा राज्यशास्त्राचाच एक घटकविषय असणार हे उघड आहे. ही भूमिका मान्य केली, तरीही प्रशासनशास्त्रात कशाचा समावेश होतो, हे ठरविले पाहिजे. नुसती शासकीय पदनामे म्हणजे प्रशासनशास्त्र बनते, अशीच परिभाषाकोश वाचून समजूत होते. जी सुचतील, आठवतील, ती शासकीय पदनामे, कार्यालये यांचा येथे समावेश झाला आहे. म्हणजे सर्वच पदे आणि कार्यालये यांचा समावेश आहे असे नाही किंवा त्यात काही विशिष्ट सूत्र आहे, असेही नाही. उदाहरणार्थ, फ्रेंच प्रशासनातील पदनामांचा इतका सुळसुळाट आहे, की आपण फ्रेंच पदनाम कोश वाचतोय, असे वाटावे. मला वाटते. कायद्याच्या संदर्भातील लॅटिन संज्ञांच्या खालोखाल फ्रेंच संज्ञा कोशात आहेत.

फ्रेंच प्रशासनयंत्रणा अभ्यासाच्या दृष्टीने विशेष महत्त्वाची आहे, असा त्यावर युक्तिवाद तरी करता येईल. त्याच्या गुणावगुणांच्या चर्चेत मी येथे जात नाही. पण 'पोलीस ऑफिसर' ही प्रशासनशास्त्रातील संज्ञा आहे. ह्यावर मात्र विश्वास ठेववत नाही. गंमत म्हणजे 'पोलीस कमिशनर'चा पर्याय सापडतो. पण पोलीस सुपरिंटेंडन्ट किंवा इन्स्पेक्टर जनरल यांचे पर्याय सापडत नाहीत. पोलीस कमिशनर

किंवा पोस्ट ऑफीस किंवा पेन्शन या संज्ञा देऊन या परिभाषाकोषाने राज्यशास्त्र किंवा प्रशासनशास्त्र कशाचेच हित साधलेले नाही.

तरीही कायदा, प्रशासनशास्त्र, आणि प्रशासनव्यवहार यांतील संज्ञा त्या कोशकर्त्यांच्या राज्यशास्त्राच्या स्वरूपाविषयीच्या प्रामाणिक मतामुळे आल्या, असे तरी म्हणणे शक्य आहे. पण फडतूस वर्तमानपत्री शब्दप्रयोग अमेरिकी बोलीभाषेतील वाक्प्रचार, आणि इतर इंग्रजी शब्द यांच्या समावेशाचे समर्थन कसे करता येईल, हे कोडेच आहे. परिभाषाकोशाचे जवळपास कोणतेही पान उघडा. त्यावर तुम्हाला biannual, blackmail, insular, inter alia, tract, witchcraft यांसारखे शब्द सापडतील. त्यांना जर पारिभाषिक संज्ञा मानायचे, तर वेगळा परिभाषा कोश न करता इंग्रजी–मराठी शब्दकोशच छापायचा ! ह्यातच कोशकारांना वर्तमानपत्री शब्दप्रयोग फारच प्रिय दिसतात. political hack, political invective, chronic campaigner, hat in the ring, honeymoon period, lightweight असले शब्द जर खरेच राज्यशास्त्राच्या परिभाषेचा भाग असतील, तर राज्यशास्त्र हा विषय विद्यापीठीय दर्जाचा विषय मानायलाच नको.

मला वाटते, परिभाषाकोश व्यापक आणि अधिकाधिक समावेशक करण्याच्या भरात हा प्रमाद घडला असावा. म्हणजे तज्ज्ञ समितीत असा काही विचार झाला असणार :

एक तज्ज्ञ : लाइटवेट ही काही शास्त्रीय संज्ञा नाही. तो शब्द कशाला घ्यायचा ? (असे कोणीतरी म्हणत असावे, ही आपली एक समजूत ! )

दुसरे तज्ज्ञ : असू द्यात, हो ! आपल्या मुलांना सर्व अंगांनी विषय कळला पाहिजे. तुम्हांला सांगतो, ह्या अमेरिकन ऑथर्सच्या लेखनात हे सगळं येतं. मॉडर्न पोलिटीकल सायन्सची टर्मिनॉलॉजी फार व्यापक बनत्येय्. तेव्हा हा शब्द राहू द्या ! (किंवा असेच काही तरी.)

सारांश उद्देश अज्ञजनांमध्ये ज्ञानप्रसाराचा असावा, पण त्यातून बुद्धिभेद होण्याचाच संभव अधिक. कारण हे शब्द पाहून वाचणाऱ्याचा दुहेरी गैरसमज होणार. एक तर हे शब्द म्हणजे राज्यशास्त्राची परिभाषा असे तो समजून चालणार. आणि दुसरे म्हणजे त्यावरून राज्यशास्त्र म्हणजे अगदी सामान्य दर्जाचा विषय आहे, त्यात वेगळे असे काही नाही, वर्तमानपत्रे वाचली, की राज्यशास्त्र समजते असा त्याचा ग्रह होणार. इथे हे स्पष्ट करायला हवे, की वाचणाऱ्याला विषय अवघड वाटावा, असे माझे म्हणणे नाही. पण अभ्यासकाला तो अभ्यासविषय वाटला पाहिजे, शिळोप्याच्या गप्पांचा नव्हे, दुर्दैवाने ह्या परिभाषाकोशामुळे राज्यशास्त्राची अशी ठिसूळ प्रतिमा उभी राहणे शक्य आहे असे म्हणणे भाग आहे.

म्हणूनच मी वर म्हटले, त्याप्रमाणे ह्या परिभाषाकोशाचे मनमोकळे स्वागत करणे अवघड आहे. मी त्याला 'राज्यशास्त्र परिभाषा कोश' असे न म्हणता 'राज्यशास्त्र कायदा, प्रशासन आणि इतर बऱ्याच गोष्टींचा शब्दार्थ कोश' असे म्हणेन. मात्र याचा सर्वच दोष कोशसमितीकडे जातो, असे म्हणणे थोडे अन्यायाचे ठरेल. हा दोष एकपरीने राज्यशास्त्राशी संबंधित आम्हां सर्वांचाच आहे. मी त्याचे अगदी थोडक्यात स्पष्टीकरण करतो. सर्वच विद्यापीठांमध्ये राज्यशास्त्राचे पदवी–पातळीपर्यंतचे अभ्यासक्रम पसरट आणि दिशाहीन असतात. विद्यापीठ पातळीवरील समित्यांचा राज्यशास्त्राविषयी कोणताही ठाम दृष्टिकोण नसल्याने सामान्य विद्यार्थी डोळ्यांपुढे ठेवून 'पाणीदार' अभ्यासक्रम बनवले जातात. त्यात आणखी पाणी घालण्याचे काम क्रमिक पुस्तकांचे लेखक, प्रश्नकर्ते, आणि शिक्षक आपापल्या परीने मनापासून करतात. म्हणजे अभ्यासक्रमात एक भारतीय विचारवंत म्हणून रानडे यांचे नुसते नाव असते. क्रमिक पुस्तकात त्यांचा परिचय असतो, वर्गात आम्ही रानडेचरित्राच्या आधारे गोष्टी सांगतो आणि प्रश्न येतो 'न्या. रानडे यांचे आधुनिक भारतीय राजकीय विचारांना असलेले योगदान स्पष्ट करा.' किंवा 'रानडे यांच्या राजकीय आणि सामाजिक विचारांचे मूल्यमापन करा.' म्हणजे रानड्यांबद्दल माहिती असलेले सगळे लिहिले, की झाले. साहजिकच या परिस्थितीत विषयाला नेमकेपण कोठेच राहत नाही. प्रत्यक्ष व्यवहारातील ह्या परिस्थितीचेच प्रतिबिंब परिभाषा कोशात पडले आहे, दुसरे काय ?

## ३

ह्या अस्वस्थ करणाऱ्या जाणिवेमधूनच आम्ही राज्यशास्त्राचा कोश तयार करण्याकडे वळलो. क्रमिक पुस्तकात अनेक कारणांमुळे विशिष्ट संज्ञा पुरेशी स्पष्ट करणे शक्य नसते. शिवाय इतर संबंधित संज्ञांचा तर काहीच विचार केला जात नाही. कोणाही अभ्यासकाला एकत्रितपणे राज्यशास्त्रातील संज्ञांची संक्षिप्त माहिती मिळाली, तर विषय–परिचयाच्या दृष्टीने ती उपयुक्त ठरेल असे आम्हांला वाटते. ह्या भूमिकेचे दोन भाग आहेत. एक म्हणजे राज्यशास्त्रातील संज्ञांची मराठीतून माहिती दिली पाहिजे आणि दुसरे म्हणजे त्या माहितीमधून राज्यशास्त्राचे स्वरूप, त्याची व्याप्ती इत्यादी बाबी अभ्यासकाच्या लक्षात याव्यात.

ह्या भूमिकेमधून राज्यशास्त्रकोश तयार करताना राज्यशास्त्राचे स्वरूप आणि व्याप्ती याबद्दलच आम्हांला निर्णय घ्यावा लागला. वर उल्लेख केलेले बहुतेक सर्व प्रश्न आमच्याही पुढे उभे राहिले. फक्त संकल्पना निवडून त्यांची माहिती द्यावी का ? तसे केल्यास खूपच काटेकोरपणा येईल. पण 'संकल्पना' नसलेल्या इतर शब्दांचा आणि शब्दघटकांचा परिचयही करून द्यायला हवा. म्हणजे नुसते लोक-

शाही किंवा निवडणूक ह्या संकल्पनाच स्पष्ट करायच्या, की उदारमतवादी पक्षांचा, निवडणूक-पद्धतींचा परिचय करून द्यायचा, हे आम्हांला ठरवावे लागले. इतिहासातील ठळक घटनांचाही परिचय करून द्यायला हवा की नको? कारण आम्ही नुसती परिभाषा तयार करीत नव्हतो तर एका विषयाची सम्यक कल्पना येईल असा परिचयकोश तयार करीत होतो. असे करता करता संस्था, व्यक्ती, घटना, संकल्पना अशा अनेक प्रकारांचा राज्यशास्त्रातील त्यांच्या महत्त्वानुसार समावेश करावा लागला. अशा प्रकारे सुमारे नऊशे नोंदी समाविष्ट झाल्या. त्यांच्या महत्त्वाप्रमाणे त्यांना कमीअधिक जागा देऊन मजकूर तयार केला. इथे पुन्हा प्रश्न आला कोश आटोपशीर व्हायला हवा, तरी माहिती पुरेशी असावी, अशी कसरत करावी लागली.

हा सर्व खटाटोप करून झाल्यानंतर आता असे वाटते, की यापेक्षा अधिक काटेकोरपणे आणि शिस्तीने काम करणे शक्य आहे. कोणतेही काम गटाने एकत्रितपणे करायचे, तर ते एकत्र बसून करायला हवे. आम्ही तिघे–चौघे बरेच वेळा एकत्र बसलो, तरीही कार्यशाळेसारखे एकत्र लेखन–वाचन–चिकित्सा ह्या क्रमाने काम व्हायला हवे, ते काही आम्हांला जमले नाही. इतकेच काय, पण सर्व लेखकांची राज्यशास्त्रविषयक एकच भूमिका आहे, असेही मी म्हणणार नाही!

कोणकोणत्या नोंदींचा समावेश आपण करावा, याची प्रथम आम्ही यादी केली. ही अर्थातच इंग्रजी शब्दांची यादी झाली. मग लेखनाच्या कामाचे वाटप केले. प्रथम लेखकाच्या आवडीप्रमाणे आणि उपशाखांमधील विशिष्ट व्यासंगाप्रमाणे हे वाटप केले. पण पुढे ते कोलमडल्यावर सर्वच लेखक सर्व उपशाखांमध्ये निपुण ठरून लेखणी चालवू लागले!

लेखकाने कोणते संदर्भ वापरावेत यावर औपचारिक नियंत्रण नव्हते. म्हणजे तशी काही यादी केली नव्हती. पण आम्ही सगळेच जवळचे मित्र असल्याने आपसांत चर्चा व्हायचीच. त्याचप्रमाणे मराठी पर्याय वापरण्याचेही लेखकांना स्वातंत्र्य होते. पुढे बरेचसे लेखन झाल्यावर सर्वत्र सारखेपणा येण्याच्या दृष्टीने एकेका पर्यायाबद्दल निश्चित निर्णय आम्ही करीत गेलो. नंतर सर्व लेखनाचे किमान दोन वेळा वाचन करून दुरुस्त्या करीत गेलो. निदान एकतृतीयांश नोंदींचे पुनर्लेखन केले. ह्या वाचन–संपादनाच्या वेळीच प्रत्येक नोंदीशी संबंधित इतर नोंदींचे परस्परसंबंध देण्याचे काम केले. म्हणजे श्रेष्ठजन ह्या नोंदीला प्रतिश्रेष्ठजन, श्रेष्ठजनवादी लोकशाही यांसारख्या संबंधित नोंदींचा संदर्भ दिला. सगळ्यांत शेवटी वर्णाक्षरक्रमानुसार नोंदी लावण्याचे काम केले.

हा सगळा तपशील सांगण्याचे कारण विषयाचे स्वरूप आणि मराठी पर्याय निवडणे ह्या दोन्ही बाबतींत आम्हांला जे प्रश्न सोडवावे लागले, त्यांचे स्वरूप आणि परिभाषाकोश तयार करतानाचे प्रश्न यांतील साम्य आणि भेद स्पष्ट व्हावेत.





अनुक्रमणिका

परिभाषा कोश आणि आमचा राज्यशास्त्र कोश यांची स्वरूपे अगदी भिन्न असूनही मी त्यांचा एकत्र विचार केला आहे. याचे कारण माझ्या मते त्या दोहोंत एक निश्चित स्वरूपाचा दुवा आहे. परिभाषाकोशाचे एकमेव उद्दिष्ट पारिभाषिक पर्याय सिद्ध करणे हे आहे. आमच्या कोशात पर्याय देऊन त्यांचा परिचय दिला आहे. साहजिकच आम्ही परिचय देत असल्यामुळे काही पर्यायांबद्दल असमाधानी असूनही ते खपवून घेतले. ह्या अर्थाने आमचे काम सोपे म्हटले पाहिजे. 'Mass society' ला पर्याय देताना परिभाषाकोशाला आटोपशीरपणा आणि अर्थघनता दोहोंवर पूर्णपणे कटाक्ष ठेवायला लागतो. त्यांनी 'लोक–समाज' हा पर्याय दिला, तर आम्ही 'समुदायरूपी समाज' असा दिला. पण आम्हांला त्याचा अर्थही पुढे स्पष्ट करायचा असल्याने काही ठिकाणी आटोपशीरपणाला तर काही ठिकाणी अर्थघनतेला फाटा देणे शक्य झाले. त्यामुळेच कम्यून किंवा फॅसिझम यांना एकेक ओळ लांबीचे पर्याय आम्ही देऊ शकलो. तसेच मार्क्सच्या ideology संकल्पनेचा 'विचारप्रणाली' हा अर्थ होत नाही, असे त्या नोंदीच्या लेखकाचे ठाम मत असूनही आम्ही त्यासाठी 'विचारप्रणाली' हाच पर्याय वापरू शकलो. मात्र शक्य तेथे शब्दार्थानुसारी पर्यायांऐवजी अर्थानुसारी पर्यायच आम्ही निवडले.

## ४

परिभाषाकोश आणि राज्यशास्त्राचा परिचय करून देणारा कोश यांना जोडणारा दुवा कोणता, याचा आता शेवटी विचार करू. एक सामाजिक शास्त्र म्हणून शास्त्रीय स्वरूपात राज्यशास्त्राची मराठीतून मांडणी करणे हा तो दुवा होय. सामाजिकशास्त्रांच्या अंगभूत वैशिष्ट्यांमुळे अपरिहार्यपणे त्यांच्या शास्त्रीय स्वरूपाविषयी संदेह निर्माण होतो. ती गप्पांचा आणि अ–विशिष्ट चर्चेचा विषय ठरतात. अलीकडे तर त्यामुळेच अनेक पत्रकार आणि स्तंभलेखक हे राजनीतिज्ञपदी पोचलेले दिसतात. संकल्पनांची शिस्त आणि सिद्धांतांची चिरेबंदी मांडणी ह्या दोन्हींच्या अभावामुळे मराठीतच नव्हे, तर इतर पाश्चात्य भाषांमध्येही राज्यशास्त्रादी सामाजिकशास्त्रांची परिस्थिती चिंताजनक आहे. अशा परिस्थितीत आपापल्या भाषेत अभ्यासकांनी सामाजिकशास्त्रांना शक्य तेवढे काटेकोर स्वरूप देणे ही अभ्यासकांची जबाबदारीच ठरते. त्यासाठी मराठीतून पर्याय ठरविणे काय किंवा संज्ञांचे मराठीतून विवरण करणे काय दोन्ही राज्यशास्त्राच्या शास्त्रीय मांडणीसाठीच्या प्रयत्नांचेच भाग मानले पाहिजेत.

पारिभाषिक पर्यायांची निर्मिती आणि विषयपरिचय यांचा परस्परसंबंध काय ? पारिभाषिक पर्याय शास्त्रीय मांडणीसाठी प्रमाण शब्दांची चौकट पुरवितात. ती चौकट समजूनउमजून वापरण्याच्या कामी विषयपरिचयकोशाचा उपयोग व्हावा, अशी

आमची अपेक्षा आहे. म्हणजेच दोन्ही प्रयत्न परस्परपूरक असून पर्यायाने दोन्ही कोश राज्यशास्त्राच्या अध्ययनाला पूरक ठरणे शक्य आहे. वियषपरिचय महत्त्वाचा ठरतो, कारण अन्यथा पर्याय हे वास्तव मूल्य नसलेल्या खेळण्यातील नोटांसारखे बनतील असे आमच्या कोशाच्या गुणवत्तेबद्दल काही न म्हणता सुचवावेसे वाटते. मी वर उल्लेख केल्याप्रमाणे विषयाचा परिचय नसेल, तर विद्यार्थी–अभ्यासक विषय न कळताच पर्यायांचा वापर करतील आणि तसे झाल्यास पर्याय तयार करण्याचे श्रमच वाया जातील. हा मुद्दा जर बरोबर असेल, तर परिभाषेच्या निर्मितीबरोबरच शास्त्रीय चर्चा–व्यवहारही मराठीत व्हावा, हे मान्य करावे लागेल. ह्या पार्श्व-भूमीवरच परिभाषाकोश अथवा राज्यशास्त्र परिचय कोश यांची त्यांच्या मर्यादा–उणिवांसह उपयुक्तता लक्षात घेऊन ते प्रयत्न अधिक उपयुक्त व्हावेत, यासाठी त्यांचे परखड आणि काटेखोर मूल्यमापन झाले पाहिजे हे पटेल.

**राज्यशास्त्रविभाग, सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे ४११०३०**

[प्रस्तुत लेख हा नेहमीच्या अर्थाने पुस्तकपरीक्षणात्मक लेख नसून त्या निमित्ताने परिभाषानिर्मिती आणि विषयपरिचय या प्रक्रियांविषयी सामाजिक ज्ञान-शाखांच्या संदर्भात चर्चा सुरू करण्याचा हा प्रयत्न मानायला हवा. अशा चर्चेचे अगत्य साहजिकच केवळ राज्यशास्त्राच्या अभ्यासकांना नसून सर्वच सामाजिक ज्ञानशाखांच्या अभ्यासकांना आहे. **भाषा आणि जीवन** २ : ४ दिवाळी १९८४ अंकातील नीलकंठ रथ यांच्या 'शैक्षणिक संज्ञापनामधील एक कोंडी' या लेखा-कडे याच सदर्भात लक्ष वेधावे लागेल. मराठी अर्थशास्त्र परिषद या आणि अशाच इतर संस्थांनी स्वतंत्रपणे वा एकत्र येऊन या प्रश्नांची चर्चा केली, तर बरे होईल. मराठी अभ्यास परिषदेलाही या प्रश्नात साहजिकच रस आहे.]

**गडकरीमास्तरांनी न सांगितलेली गोष्ट**

सांगण्यासारखं जवळ काही उरलेलं आहे तोपर्यंतच थांबण्यात मौज आहे.

# ' पूर्वग्रह ' : जैविक आणि भाषिक

**दीपक घारे**

विश्वरचनेचे सम्यक ज्ञान करून घेण्याच्या प्रक्रियेमधे भाषा हे एक महत्त्वाचे साधन आहे. चित्रकला, संगीत अशा इतर कला मानवी भावना समर्थपणे व्यक्त करू शकतात, स्वतःचा अनुभव इतरांपर्यंत पोचवू शकतात; पण या साधनामधे मुळातच संदिग्धता असते. कलेच्या दृष्टीने ती उपकारक ठरली, तरी शास्त्रीय विचार मांडण्यासाठी आवश्यक असणारा नेमकेपणा तुलनेने भाषेतच अधिक असतो. म्हणूनच ज्ञानप्रसाराचे साधन म्हणून भाषेचाच वापर सर्वाधिक प्रमाणात केला जातो.

असं असलं, तरी भाषेला मूलभूत अशा मर्यादा आहेत. या मर्यादांचा संबंध थेट जीवसृष्टीच्या विकासासाठी कसा पोचतो, याचे विवेचन हॉयमर व्ही. डिटफर्थ यांच्या '**द ओरिजिन्ज ऑव्ह लाइफ**' या ग्रंथात केले आहे. हा विषय अर्थातच मूळ प्रतिपादनाच्या संदर्भात जाता जाता आला आहे. विश्वरचनेचा परिपूर्ण शोध घेण्यासाठी वैज्ञानिक सत्य आणि आध्यात्मिक सत्य यांची सांगड घालणं कसं आवश्यक आहे, हे विज्ञानाचाच आधार घेऊन इथं सांगितलं आहे. भाषेसंबंधी डिटफर्थ यांनी मांडलेले विचार भाषाविचाराला एक वेगळी जीववैज्ञानिक बैठक प्राप्त करून देतात.

विश्वरचनेचे आणि पर्यायाने सत्याचे संपूर्ण आकलन आपल्याला कधीच होणे शक्य नाही, याची जाणीव मानवाला सतत होत आलेली आहे. मानवी मेंदू संपूर्ण विश्वरचनेचाच एक भाग आहे, एक अंश आहे. आणि हा अंश पूर्णाचे आकलन करण्यास केव्हाही अपुराच पडणार! आपल्याला जे जाणवतं, जे आपल्या अनुभवाच्या कक्षेत येतं, त्यापलीकडे काही सत्य अथवा वास्तव असू शकेल, याची जाणीव मानवाला अगदी प्रारंभापासून आहे. याची साक्ष ईश्वरविषयक धार्मिक संकल्पनांमधून दिसतेच. पण आता वैज्ञानिक पुराव्यावरूनही ही गोष्ट स्पष्ट झालेली आहे. आपल्याला होणारं वास्तवाचं आकलन आणि प्रत्यक्ष वास्तव यात मुळातच फरक असतो. विश्वरचनेचे खरे नियम आणि आपल्या आकलनशक्तीद्वारा प्रतीत झालेले नियम हे तंतोतंत जुळत नाहीत हे सापेक्षतावादाच्या सिद्धांतावरून समजतेच. याचं कारण आपल्याला होणारं वास्तवाचं ज्ञान हे ज्या यंत्रणेद्वारे होतं, ती यंत्रणा ज्ञानग्रहणासाठी निर्माण झालेली नसून जीवसंघर्षात टिकून राहण्याच्या गरजेपोटी निर्माण झालेली आहे. या गरजेला पोषक एवढंच आणि या पूर्वप्रेरणेनं संस्कारित असंच ज्ञान प्रत्येक जीवाला होत असतं. उदाहरणार्थ एखादा अनुभव घेण्यापूर्वीच त्या अनुभवाला तोंड कसं द्यायचं, याचं अनुभवपूर्व ज्ञान कोंबडीच्या पिलाला उपजतच असतं. पिलाच्या शत्रूचे म्हणजे समजा मांजराचे ' चित्र ' पिलाच्या मेंदूत आधीच कोरलेले असते. पिलाच्या दृष्टीने हे मांजराचे ' चित्र ' जागे होणे म्हणजेच

वास्तवाचे आकलन होणे. मग ते विजेच्या धक्क्याने कृत्रिमपणे जागे केले, तरी समोर काही नसूनही ' काल्पनिक ' शत्रूला पिलू घाबरते. प्राणपणाने प्रतिकार करते. वास्तव आणि आकलन यांच्यांतली ही जशी प्राथमिक पातळीवरची तफावत दिसून येते, तशीच ती वैचारिक पातळीवरही असते.[१]

विश्वरचनेच्या आकलनामध्ये हे जैविक पातळीवरचे ' पूर्वग्रह ' जसे आड येतात, तसेच भाषेने निर्माण केलेले पूर्वग्रह आड येतात. कारण भाषादेखील मानवी मेंदूनेच निर्माण केलेले एक साधन आहे आणि पूर्वग्रह कोणतेही असोत, ते सहजासहजी सोडून देणं फार कठीण असतं.

कांटने सांगितलेली अनुभवपूर्व अट (ए प्रायोराय) ही अशा आकलनप्रक्रियेत भूमिका बजावत असल्यामुळे ' पूर्वग्रह ' निर्माण होतात. प्रत्येक गोष्टीला कार्यकारणभाव असलाच पाहिजे, हा ' पूर्वग्रह ' आपण सृष्टीतल्या प्रत्येक घटनेवर लादत असतो. जीव-सृष्टीची निर्मिती झाली, याचा अर्थ तिची निर्मिती करणारा कुणीतरी असलाच पाहिजे, हा असाच एक पूर्वग्रह.

आनुवंशिक गुणसूत्रांची ( जीन्ज) ' भाषा ' आणि व्यवहारातली भाषा यांत मुळातच भेद आहे, याची आपण दखल घेत नाही. व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या अक्षरांच्या समूहाला एक वेगळा विशिष्ट अर्थ असतो. आणि हा अर्थ सांगणारा आणि ऐकणारा दोघांनाही सारखाच प्रतीत होणं आवश्यक असतं. त्यामुळे भाषेत दिला जाणारा संदेश प्रत्यक्षात येण्यासाठी एक सांगणारा आणि एक ऐकणारा असलाच पाहिजे, असे आपण गृहीत धरून चालतो. गुणसूत्रांच्या भाषेत चेतकांच्या समूहाला विशिष्ट क्रम असतो, पण शब्दासारखा वेगळा अर्थ नसतो. त्यामुळे संदेश देणारा आणि ग्रहण करणारा अस्तित्वात नसला, तरी ' माहिती ' संक्रमित होते. जीवसृष्टीचा विकास अशा पद्धतीने निर्मात्याच्या आराखड्याशिवाय होत आला आहे, पण भाषेबद्दलच्या आणि कार्यकारणभावाच्या ' पूर्वग्रहांमुळे ' आपण निर्मात्याचे अस्तित्व गृहीत धरतो. सर्व धर्मांमधल्या ईश्वरविषयक संकल्पनेचे मूळ या ' पूर्वग्रहां 'मधे आहे.

अशा पूर्वसंस्कारित अनुभवाशी संवादी असे भाषेचे स्वरूप राहिल्यामुळे एखादी वस्तुनिष्ठ गोष्ट सांगताना अप्रस्तुत अशा अर्थच्छटा विनाकारण येतात. शिवाय माणूस स्वतःला या विश्वरचनेच्या केंद्रस्थानी कल्पून भोवतालचं वास्तव जाणून घेत असल्यामुळं वास्तवाबद्दलचं विपर्यस्त चित्र तयार होतं. पृथ्वी स्थिर असून पृथ्वीभोवती सूर्य फिरतो, मानव हा जीवसृष्टीच्या विकासाच्या मार्गावरील सर्वात प्रगत आणि अखेरचा टप्पा आहे, यासारख्या समजुती विज्ञानाने खोट्या ठरवूनही त्या मानवाला अजूनही आकर्षक वाटतात, याचं कारण हेच आहे.

भाषेचा वापर करतानाही आपण स्वतःला केंद्रस्थानी मानतो. ' सूर्य अस्ताला गेला ', ' दादर स्टेशन आलं ' असं आपण म्हणतो, तेव्हा वास्तव निराळंच असतं. सूर्य, स्टेशन

आहेत तिथेच असतात, स्थिर नसतो आपण! वाक्यामधला कर्ता हा आपल्या भाषेत कर्तासवरता असतो. 'झाडे सळसळतात' 'विस्तीर्ण माळ पसरला होता', 'चंद्र ढगाआड गेला' असे म्हणताना आपण अचेतन वास्तवाला (प्रत्येक गोष्टीला प्रेरणा देणारा कोणीतरी असला पाहिजे, या पूर्वग्रहापोटी) सचेतन करीत असतो.

व्यवहारात अशा गोष्टींनी काही विशेष फरक पडत नाही. पण व्यवहारी जगापलिकडच्या वास्तवतेच्या संदर्भात शब्द आणि प्रत्यक्ष वास्तव यांच्यांतली दरी वाढत जाते. वास्तवाचे अधिकाधिक वस्तुनिष्ठ आणि स्व-निरपेक्ष आकलन होण्यासाठी हे भाषिक जैविक पातळीवरचे पूर्वग्रह दूर करण्याचे प्रयत्न व्हायला हवेत. तसे ते झाले, तर संवेदनाशक्तीची आणि आकलनशक्तीची एक वेगळी पातळी मानवाला लाभू शकेल.

हे 'पूर्वग्रह' पूर्णपणे दूर करता येणार नाहीत, हे तर उघडच आहे. पण त्यांच्या अस्तित्वाची पूर्णपणे जाणीव झाली, तरी वास्तवाचे ज्ञान अधिक वस्तुनिष्ठपणे होण्यास त्याची मदत होईल. निदान या पूर्वग्रहांविषयी अधिक सावध राहणे शक्य होईल.

भाषा ही विशिष्ट काळातील संस्कृतीशी निगडित असते. त्यामुळे या कालनिबद्ध संस्कृतीच्या चौकटीतच ती अर्थपूर्ण होते. हे संदर्भ लक्षात न घेता भाषेचा लावलेला अर्थ नुसताच अपुरा न राहता, कधी कधी अर्थविपर्यास करणाराही ठरू शकतो. ज्या प्रमाणात मानवाच्या जाणिवेच्या कक्षा विस्तारत गेल्या, त्या प्रमाणात भाषेतही बदल होत गेले. विकासाच्या विशिष्ट टप्प्यावर असलेले विशिष्ट शब्दांचे अर्थ कालांतराने बदलत गेले. सिकंदराच्या काळात जग या शब्दाची असलेली व्याप्ती आणि आज त्याच शब्दाची व्याप्ती यांत पुष्कळच अंतर आहे. आज आपल्याला जाणवणारे अवकाश आणि आदिमानवाला जाणवलेले अवकाश यात खूपच फरक आहे. म्हणूनच प्राचीन धर्मग्रंथांचा, पुराणकथांचा आजच्या भाषेप्रमाणे शब्दशः अर्थ लावला, की तो वास्तवाशी विसंगत वाटू लागतो. तेव्हा विचार समजून घेताना भाषेची कालसापेक्ष सांस्कृतिक चौकट लक्षात घ्यायला हवी.

वास्तवाचे अधिकाधिक आकलन होण्यासाठी आज भाषेचा एकाच पद्धतीने वापर करणे योग्य ठरणार नाही, असे तज्ज्ञांना वाटते. पूर्वापार चालत आलेली पुराणकथांमधल्या मिथ्यांची प्रतीकात्मक भाषा आणि विज्ञानाची काटेकोर निर्देशात्मक भाषा असे आजचे दोन प्रमुख प्रवाह आहेत.

मिथ्यांमधली प्रतीकात्मक भाषा ही अनेक अर्थ सूचित करणारी अशी असते. त्यातून व्यक्त होणारा आशय मनाच्या अबोध पातळीतून, नेणिवेतून आलेला असतो. हा आशय जाणिवेच्या पातळीवर तर्कसंगतपणे मांडता येत नाही. कारण त्याच्या मुळाशी व्यक्तिगत जाणिवेपेक्षा सुप्त समूहमनाद्वारा पिढ्यानुपिढ्या संक्रमित झालेली जाणीव कार्यरत असते. जे सर्वमान्य आहे, पण वस्तुस्थितीला धरून नाही, ते मिथ्य, अशी एक समजूत आहे. पण पूर्वी 'मिथ' या शब्दाला असलेला अर्थ आता पुन्हा मान्य होऊ लागला

आहे. जे अन्य कोणत्याही मार्गाने व्यक्त करता येत नाही, पण जे रूपकाचा आधार घेऊन सूचकतेने व्यक्त करता येते, ते म्हणजे 'मिथ'. ज्या गोष्टी कधी घडल्या नाहीत, पण ज्या नेहमीच अस्तित्वात असतात, अशा गोष्टींनाच पूर्वीच्या काळात मिथ्यांचे स्वरूप दिले गेले. जोपर्यंत मानवी मन आणि मेंदू यांचा संबंध विज्ञान उलगडू शकत नाही, तोपर्यंत विज्ञानाने सिद्ध होऊ न शकणाऱ्या, पण अस्तित्वाची खात्री पटलेल्या वास्तवाचे आकलन होण्यासाठी रूपकात्मक भाषेचा आधार घेणे अटळ आहे.

वैज्ञानिक परिभाषा नेमकी उलट असते. तिच्यातून व्यक्त होणारा अर्थ अधिक नेमका असतो. व्यवहारी भाषेपेक्षा तिचे स्वरूप अधिक क्लिष्ट, विषयाशी संबंधित मोजक्या तज्ज्ञांनाच समजेल असे असते. रूपकात्मक भाषेतल्या आशयाचं स्वरूप वाचणाऱ्याच्या आकलनक्षमतेनुसार थोडेफार बदलणारे म्हणजेच ग्राहकसापेक्ष असते, तर वैज्ञानिक परिभाषेतला आशय परिभाषा समजणाऱ्या सर्वांना सारखाच प्रतीत होतो. मिथ्यांची भाषा मुळातच जीवनाच्या एकात्म जाणिवेतून निर्माण होते. वैज्ञानिक परिभाषा सुरुवातीलाच वास्तवाचा छेद घेऊन, एक विशिष्ट भाग निवडून कार्यकक्षा सीमित करून घेते.

भाषेची ही दोन स्वरूपे परस्परविरोधी वाटली, तरी तशी ती नाहीत. कारण वास्तवाचे परिपूर्ण ज्ञान हेच दोन्हीचे अंतिम उद्दिष्ट आहे. पहिल्याचा भर अमूर्तावर, अंतःप्रेरणेवर आहे, तर दुसऱ्याचा भर निरीक्षणातून निघणाऱ्या निष्कर्षांवर आहे. आकलनात येणारे अडथळे दोन्ही प्रकारच्या भाषांमध्ये आहेतच. लेखनाच्या कलेमुळे ज्ञान साठवून ठेवण्याची आणि हवे तेव्हा उपलब्ध करून देण्याची क्षमता मानवी मेंदूच्या कितीतरी पटीने वाढली. आता संगणकांमुळे तर या अधिक ज्ञानसंचयाची क्षमता आणि प्रक्रियेचा वेग यांत विलक्षण वाढ झाली आहे. अशा वेळेस केवळ विज्ञानाचाच आधार न घेता मिथ्यांमधला आशय आणि वैज्ञानिक निष्कर्ष यांच्यांतल्या संगती-विसंगतींचा चिकित्सकपणे शोध घेतला, तर ते फायद्याचे ठरू शकेल.

संगणकाची भाषा, वैज्ञानिक परिभाषा, रूपकांची भाषा, व्यवहारातील भाषा अशा विविध स्वरूपांनी अनंतरूपी वास्तवाचा शोध घेणं आवश्यकच आहे. पण या सर्व भाषेच्या स्वरूपांच्या मुळाशी एक समान भाषेचे सूत्र आहे, याचे भान ठेवले पाहिजे. लिहिण्याची कला शोधून काढणाऱ्या इजिप्तच्या थोथ देवाला (Thoth) देवांचा राजा थामुस (Thamus) याने इशारा दिला होता.

"या तुझ्या शोधामुळे शिकणाऱ्यांच्यामधे विसराळूपणा वाढीस लागेल, कारण ते स्मरणशक्तीचा वापर करणार नाहीत. शब्दार्थापेक्षा शब्दांच्या बाह्यरूपावरच ते अधिक विश्वास ठेवतील. तू शोधलेलं साधन स्मरणशक्तीला मदत करणारं नसून, गतस्मृतींना सहायभूत होणारे आहे. तू तुझ्या शिष्यांना सत्य देणार नाहीस, तर सत्याचा आभास देशील. ते अनेक गोष्टींचे निवळ श्रोते ठरतील, पण शिकणार काहीही नाहीत. ते सर्वज्ञ भासतील, पण कसलेही ज्ञान त्यांना झालेले नसेल. वास्तवविरहित अशा उपजत शहाण-

पणाच्या प्रदर्शनामुळे त्यांचा सहवास कंटाळवाणा ठरेल.''[२]

आजच्या संगणकांच्या, प्रसारमाध्यमांच्या जगात माहितीचे अजीर्ण व्हावे, अशा प्रमाणात आपल्या कानांवर ती आदळत असते. अशा वेळेस हा इशारा अगदी मनोमन पटावा, असा आहे! भाषेच्या चक्रव्यातून बाहेर पडण्यासाठी आणि तिचा वास्तवाच्या आकलनामधे अधिकाधिक उपयोग करून घेण्यासाठी म्हणूनच सर्वच प्रकारचे 'पूर्वग्रह' दूर करणे आवश्यक आहे!

**संदर्भ**


1. Hoimar V. Ditfurth, **The Origins of Life**, Translated from German by Peter Heinegg, New York : Harper & Row, 1982 मूळ जर्मन Wir Sint nicht nur von dieser Welt... Hamburg: Hoffman & Campe, 1985.)
2. Carl Sagan, **The Dragons of Eden** New York : Ballantine Books, New York, 1983 (earlier : New York, Random House 1977).



**शासकीय मुद्रणतंत्र संस्था, मुंबई ४०० ००१**


**कवितेचा धसका**

अलीकडे मला कुणीकुणी विचारतात, की पुष्कळशा लोकांनी कवितेचा धसका घेतलेला असतो, तो का? माझं यावर म्हणणं असतं, की कविता शब्द वापरते, ते शब्द अगदी कडक असताना. आपल्या रोजच्या वापरात–मग ते वृत्तपत्रीय लेखन असो, संभाषण असो, पत्रव्यवहार असो, शब्द फारच दुबळे असतात. म्हणजे असं पाहा. दोन पेले घ्या. एकात एक बोटभर जिन घालून उरलेला पेला पाण्यानं भरा, हा झाला शब्दांचा वापर. दुसऱ्यात तोंडापर्यंत सरळ जिन ओता. थांबा, कविता म्हणजे एकदम कडक 'नशीला' प्रकार आहे, असं नाही मला म्हणायचं. मला दुसरंच काही सुचवायचं आहे. तसं पाहायला गेलं, तर दोन्ही पेले अगदी एकसारखे दिसतील आणि जेव्हा मागाहून पत्ता लागतो, की तसं अजिबात नाही आहे, तेव्हा मंडळी जाम वैतागतात. कविता त्यांना फार कडक पडते आहे असं त्यांच्या लक्षात येतं. दिसायला अगदी साळसूद, पण एकाएकी तुम्ही धारेत ओढले जाता, अगदी मुळापासून हादरता, तुम्हांला तो एक धक्काच मिळतो. आणि शॉक कुणाला आवडेल!

**पॅट्रिक डिकिन्सन, बी. बी. सी. (लंडन) वरील भाषण, द लिसनर १९५३.०७.२३**
**प्रेषक : पुरुषोत्तम पाटील, धुळे. अनुवाद : अशोक रा. केळकर**

# नाट्यात्म भाषणातील आवाज-जोपासना

अशोक दा. रानडे

आवाज जोपासना आणि नाट्यात्म भाषण यांचा परस्परसंबंध तपासताना पहिला मुक्काम लागतो, तो नाट्यात्म भाषणाचे स्वरूप समजून घेण्याचा. त्यानंतरचा थांबा म्हणजे भाषण यशस्वीपणे नाट्यात्म करण्यासाठी आवाज-जोपासनाशास्त्राचा पाठपुरावा कसा करावयाचा, ते पाहण्याचा. आवाज-जोपासना नक्की काय करू शकते, तेही प्रस्तुत चर्चेतून स्पष्ट व्हावे. नाट्यशिक्षणाच्या प्रणाली जास्त अर्थपूर्ण होण्याकरिता विवेचन सहायक ठरेल. औपपत्तिक आणि प्रत्यक्षाभ्यासाच्या पातळ्यांवर एकाच वेळी वावरणारे विवरण गुणवत्तेच्या अंगाने जाणारे नाट्यात्म भाषण कसे शिकवावे, हे सांगता सांगता नाट्यात्मतेच्या स्वरूपाविषयी निष्कर्षही पक्के करू शकेल.

## मदतीचे मार्ग

नाट्यात्म भाषणास आवाज-जोपासना कोणत्या मार्गे साहाय्य करू शकते ?

तारता, गहिमा आणि ध्वनिवैशिष्ट्य अशा तिन्ही ध्वनिपरिमाणांच्या आवाक्यांत आवाज-जोपासनेमुळे वाढ होते. कोणतेही भाषण शेवटी वरील तिहींमधूनच सिद्ध होत असते. कंठयंत्रणा मूलतः बोलणे वा गाणे यासाठी तयार झालेली नाही. बोलणे/गाणे हा या यंत्रणेकडून आपण प्राप्त करून घेतलेला बोनस आहे. जादा काम करून घ्यावयाचे असल्याने आवाजाची जोपासना करावी लागते. दैनंदिन वा सर्वसाधारण वापराच्या पलीकडे जाऊनच भाषणाची नाट्यात्मता सिद्धीस जाते, हे ध्यानात घेता, आवाजाच्या वापराची विशेष तंत्रे आवश्यक ठरण्यात तर्कशुद्धता आढळावी. दोहोंमधे मार्गांतर आहे, मूळवाटेपासून दूर जाणे आहे आणि म्हणून निराळी तंत्रे आहेत. आवाजाचे उत्पादन करणाऱ्या यंत्रणेवर तिन्ही ध्वनिपरिमाणांबाबत जाणीवपूर्वक नियंत्रण शक्य करून देणे आवाज-जोपासनेचे प्रमुख कार्य होय.

## पद्धत विरुद्ध अनुमान-धपका

आवाज-जोपासना ही इतर विधाने व शास्त्रे एकत्र आणून आपला संसार थाटते. अनेक विचारशाखांतील सिद्धांत वगैरेंची प्रत्यक्ष राबवणूक त्यात केली जाते. उदाहरणार्थ, शरीररचना, शारीरक्रिया, ध्वनिविज्ञान (शारीर आणि वास्तुशास्त्रीय), मानसशास्त्र, उच्चारशास्त्र, योग यांचा निर्देश करता येईल. प्रस्तुत संदर्भात दोन महत्त्वाचे निष्कर्ष नोंदले

पाहिजेत :

एक तर असे, की इतर वस्तुनिष्ठ शास्त्रांचे निष्कर्ष वापरून आवाज-जोपासना काही बाबतींत निश्चित व भौतिक फले साधू शकते. श्वासाचा पुरवठा, भाषिक स्वरांना आकार देणे, आवाजाची फेक, तारतेचा आवाका, गरिम्याचे दर्जे वगैरेंचा इथे निर्देश करता येतो. आवाज-जोपासनेत या कारणाने बरीच भविष्यनीयता येते. अंदाजे करत राहण्यापलीकडे मामला पोचू शकतो.

दुसरे म्हणजे ज्या शास्त्र-विज्ञानांचा आवाज-जोपासना वापर करते, त्यांच्या स्वरूपांमुळे आवाज-जोपासना एका मर्यादेपर्यंत पण निश्चितपणे वंश, भाषा आणि संस्कृतिनिरपेक्ष होते. आवाजाच्या वापरातील सार्वत्रिक तत्त्वांशी गाठ घेणारे शास्त्र म्हणूनच शारीर-सांस्कृतिक आणि वंश-सांस्कृतिक या दोहोंकडून छेद न पावता कार्यकारी राहते. सर्व आवाजदारांना आवाज-जोपासना उपयोगी पडते.

गूढता, दैववाद, आणि अपघात या तिहींना आवाज-जोपासना कमीत कमी स्थान देते.

## संवाद ते स्वनरचना

एकंदर नाट्याविष्कारातील आवाज-रेषेला नीटस आकार देण्यासाठी आवाज-जोपासना कसे साहाय्य करते, याकडे योग्य लक्ष दिले जात नाही. नाट्याविष्कारातील आवाजांचे वातावरण कसे असते ? आवाजी सुपरऑब्जेक्टिवजकडे सर्व आवाजाचा झोत (स्तानिस्लावस्कीस धरून बोलावयाचे, तर) जात असतो असे म्हणता येईल काय ? समग्र आवाजी-वातावरण निरनिराळ्या प्रकारच्या आवाजांनी रेखलेल्या व्यक्तिभूत रेषांचा संकलित परिणाम म्हणूनच सिद्ध होत नसते काय ? ते कसेही असो, नाट्याविष्कारातल्या महत्त्वाच्या प्रत्येक क्षणाला उपस्थित सर्व आवाजांचे एकमेकांशी अर्थपूर्ण नाते हवे. इतर पात्रांच्या निरपेक्ष आवाजांचा वापर करता येतो, पण मग ते उदाहरण ऐकणाऱ्या नार्सिससचे होते ! आवाजांचे परिणाम जाणीवपूर्वक, दक्षपणे बांधत जावे लागतात. याकरिता आवाजांची स्वनरचना म्हणजे काय, त्याची गरज काय व तंत्रे कोणती, याचे पात्रांना भान हवे. आवाजाची सर्व परिमाणे ग्रहण करणारे कान व निर्माण करणारे कंठ हवेत. कोणत्याही सामूहिक प्रयत्नांत कलेइतकीच कारागिरी लागते. स्फूर्तीच्या क्षणैक झटक्यांपेक्षा सहेतुक व दीर्घकालीन साधनेची नाट्याविष्कारात गरज असते. नाहीपेक्षा संवादशिल्प उभे न राहता, त्यांची मालिका कानी पडते. सुट्या भाषणांचे शिल्प बनते ते स्वनरचनेच्या व्यापक वास्तुशिल्पीय तत्त्वामुळे. पात्रे म्हणजे आवाजांचे उगम नाहीत, तर फुलत राहणाऱ्या नाट्यात्म तणावांची ती केंद्रे आहेत. आवाजाची फेक करण्यात व्यक्तिगत छाप दिसते, तशीच शैली-आणि शैली एक सामाजिक निर्मिती असते.

स्वनरचनेचा प्रत्यय सूक्ष्मतेचा असतो आणि ठोस संघर्षापेक्षा त्याचा भर अल्पावधीचे व बारकाव्याचे विरोधसंबंध सिद्ध करण्यावर असतो. आवाजाच्या परिणामांचेही सूक्ष्म भेद

होतात आणि त्यांकडे आवाज–जोपासना लक्ष वेधते. आधी चर्चिल्याप्रमाणे तारता आणि गरिमा या दोहोंवरच अनेक कारणांनी लक्ष देण्यात आले आहे. या परिस्थितीत बदल घडविणारा दृष्टिकोण आवाज–जोपासनेतून मिळतो.

### आवाज : वर्गीकरण व भूमिकानिर्धार

आवाजाच्या विश्वाकडे बारकाईने पाहिल्यामुळे दोन संकल्पनांना विशेष बळ चढते. आवाजाचे वर्गीकरण आणि आवाजानुसार वर्गीकरण.

भूमिका अमूर्त असते. वेशभूषा,हावभाव, इत्यादींद्वारा ती मूर्त, तर आवाज-भाषणातून ती बोलकी होते. प्रस्तुत सर्व गोष्टी एका वेळेस सामोऱ्या येत असतात, क्रमाक्रमाने नव्हे. त्याचा परिणामही संकलित असतो. चरित्ररेखनात म्हणूनच काही प्रतिनिधित्व येत असते. याशिवाय प्रत्येक नाट्यपरंपरेचे स्वतःचे म्हणून काही प्रघात दिसून येतात. मुद्दा असा की या सर्व कारणांमुळे आपण समजतो, त्यापेक्षा बऱ्याच अधिक प्रमाणात पात्रांचे वर्ग तयार होत असतात. तुल्य अशा आवाजांच्या वर्गांची आता जाणीव होणे गरजेचे आहे. आवाजांची वर्गवारी आजही अस्तित्वात आहे. पण ढोबळपणे आणि अपघाताने पात्ररेखाटनाच्या संदर्भात प्रकाशयोजना, वेषभूषा, हालचाली इ. बाबतींत सूक्ष्मता आणण्याच्या दिशेने प्रयत्नशील असता, तोच न्याय आवाज आणि पात्रयोजना यांना का लागू नये ? आवाजानुसार आपण भूमिकानिर्धारण करतो का ? भाषणाचे चढउतार आणि आवाजाची गुणवत्ता यांत गोंधळ करून कसे चालेल ? आवाजातील गुणवत्ता अधिक पायाभूत थरावर, तर भाषणातील चढउतार लेपासारखे होत. मानवी शरीराच्या मूलभूत स्थिरावस्था आणि त्याचे शक्य मोहरे वा पवित्रे यांत जसा फरक आहे, तसाच प्रकार आवाजाची गुणवत्ता व भाषणातील चढउतार याचा आहे. मूलभूत स्थिरावस्था व गुणवत्ता पायाभूत व निरंतरच्या, तर पवित्रे व चढउतार वरवरचे व तात्पुरते असतात. चढउतार विशिष्ट कालमानात आवाजाच्या गुणवत्तेचा कमी-अधिक वापर करतात; पण आवाजाची गुणवत्ता व्यक्तिमत्त्वाचा ढंग दाखविते. म्हणूनच आवाजानुसार पात्रयोजना केल्यास नाट्यात्मतेचे स्वरूप तर्कपूर्त होईल. भाषा आणि भाषण शिकून, शिकवून मिळविलेल्या गोष्टी असतात, आवाज ‘असतो.’ आवाज अधिक व्यक्तिगत, तर भाषा/भाषण सामाजिक. म्हणूनच आवाजामुळे मूळ, अनलंकृत, आतल्या माणसापर्यंत पोचण्याचा संभव जास्त असतो. अनेकांनी दाखवून दिल्याप्रमाणे भावनिक तणावाच्या क्षणी भाषा नाही, तर आवाज अभिव्यक्ती करतो. त्याचप्रमाणे तरल आणि सूक्ष्माची जाणीवही आवाजातून अधिक होते. आवाजांची वर्गवारी, आवाजांनुसार भूमिकानिर्धारण यांचा संकलित परिणाम नाट्यानुभवाच्या संपन्नतेवर होईल.

## ध्वनिशास्त्रीय भोवताल

नाटकाचे सादरीकरण बंद जागांत हाच आजचा नियम आहे. नाट्यात्म भाषणावर प्रेक्षागृहाच्या बंदपणाचा निश्चित परिणाम झाला आहे. बंदिस्त प्रेक्षागृह, त्यातली सजावट, कोलाहल व उष्णता-पातळ्या, सामानसुमानाचे घाट व आकारमान, इत्यादींमुळे ध्वनि-शास्त्रीय भोवताल तयार होत असते. सार्वजनीन प्रेक्षण-जुळणीची भर आहेच.

मुद्दा असा, की निर्मिती आणि ग्रहण या दोन्ही बाबतींत उपलब्ध असलेला ध्वनिवर्ण-पट आता बराच विस्तृत आहे. ठोकळ ध्वनिपरिणामांचे युग जाऊन सूक्ष्म आणि विविध ध्वनिभेदांनी त्यांची जागा घेतली आहे. तारता आणि गरिमा यांची पीछेहाट चालू असून, ध्वनिवैशिष्ट्याची आगेकूच आहे.

ग्रहणाच्या बाजूने पाहता श्रवणगत 'क्लोज-अप' मिळण्याची सोय झाली असून, सूक्ष्म भेद ग्रहण करता येतात. उच्चाराकृती नीटसपणे रेखल्या जातात व त्यांची नोंद तशीच होऊ शकते. गिलगुडने मात्र आणखी एक बाजू समोर आणली आहे. रंगभूमीची दोन मूल्ये, भाषण व स्तब्धता सूक्ष्मध्वनिग्राहकामुळे विकृत झाली आहेत, असे त्याचे म्हणणे. कारण श्रोत्यांचे श्रवण बोथट झाले आहे! तरल सूक्ष्म नाटक मोठ्या प्रेक्षागृहात सादर करणे, आज अधिक आव्हानकारक ठरते असेही तो सांगतो.[१] सूक्ष्मध्वनिग्राहका-मुळे श्रवणातले अवधान कमी होते, जे काही ऐकण्याजोगे असेल, ते कानापर्यंत पोचविले जाईलच, असा विश्वास बाळगून श्रोते ढिलेपणे ऐकतात, अशी गिलगुडची कारणमीमांसा वाटते. याच संदर्भातले नटांचे पाप कोणते, त्यावर काळ्यांनी प्रकाश टाकला आहे.[२] आधुनिक अभिनेत्यांना आवाजाची फेक जमत नाही, याविषयी खंत व्यक्त करून, मोठ्याने बोलणे अनैसर्गिक असा आधुनिक अभिनेत्यांचा ग्रह असल्याचे काळे नोंदतात. ढिले श्रोते व आळशी अभिनेते आधुनिक शास्त्रीय सुधारणांचा परिणाम होय, असा दोघांचा चिंतनीय निष्कर्ष आहे.

वास्तविक पाहता एकूण चित्र वाटते तितके परस्परविरोधी नाही. ध्वनिशास्त्रीय बदल समजून घेतला पाहिजे, इतकेच. ढाल्या स्वनाचा वापर म्हणजे अशक्त आवाज नव्हे आणि संवेदनशील सूक्ष्मध्वनिग्राहक कमावलेल्या आवाजाबदली वापरता येत नाही. नाट्यात्म भाषणात आवाज-जोपासना इथे योग्य वळणे आणू शकते.

आजचे नाट्यात्म भाषण तुटक का? आशयामुळे तुटक वाक्ये इत्यादी येतात, हे खरेच; पण ध्वनिशास्त्रीय भोवतालाचाही हातभार पाहण्यासारखा आहे. लांब लांब वाक्ये कमी उपयुक्त झाली. कारण बदलत्या ध्वनिशास्त्रीय परिस्थितीमुळे ऐकण्याला पाठिंबा मिळाला व वाक्यखंडांनी काम भागू लागले. आता लांब वाक्ये खास ध्वनिपरिणाम ठरतात व म्हणून हात राखून आणि सहेतुक योजावी लागतात. कमी कालावधीची एकके फेकण्यास सोपी असतात. खटकेबाज संवादांची प्रथासुद्धा ध्वनिशास्त्रीय भोवतालाशी निगडित आहे. खटकेबाज संवादाची दोन लक्षणे असतात. आविष्कारमार्गाची मक्तेदारी

कुणी घेऊ नये व सहभाग राहावा, म्हणून खटकेबाज संवाद अवतरतात. याशिवाय सुधारित ध्वनिशास्त्रीय वातावरणात दीर्घावधीची भाषण–एकके तापदायक वाटतात, हेही कारण ध्यानात घ्यायला हवे.

या संदर्भात शेक्सपीअर–वळणाचे दोन प्रमुख नट आवाजाच्या लगावाविषयी काय सूचना देत, ते पाहण्यासारखे आहे. आपल्या आवाजातील गहराईचा अभाव भरून काढावा, याकरिता आयर्विंग स्वरवर्ण आणि उच्चारावयव लांबवीत असे.[3] या उलट गिलगुडचे निक्षून सांगणे, की तसे करू नये.[4] बदलत्या ध्वनिशास्त्रीय वास्तवाला दोन्ही नटांनी (आपापल्या काळी) दिलेले प्रतिसाद विरोधी वाटल्यास नवल नाही. कारण संबंधित वास्तवांची लक्षणे विरोधी दिशांनी उत्क्रांत झाली. भाषणातील एककांच्या कालावधीबाबतचे निर्णय ध्वनिशास्त्राशी निगडित आहेत. भाषणकाल व अवकाश दोहोंत सिद्ध होत असते. आवाज-जोपासनेच्या आधारे नवीन वास्तवाशी जुळवून घेणे शक्य आहे.

कमी कालावधीच्या आधुनिक भाषण–एककात जाणवणारा मुख्य प्रश्न थोडक्या वेळात भावनिक तीव्रता गाठणे व ती लोकांपर्यंत पोचविणे हा होय. या संदर्भात आवाज–जोपासनेची भूमिका महत्त्वाची ठरते; कारण योग्य संतुलनातून, लवचिकपणे यंत्रणा वापरून भाषण, व्यवहार सक्षमतेने कसा साधावा, यावरच प्रयत्न केंद्रित केलेले असतात.

नाट्यव्यवहार स्वावलंबी व्हावा, याकरिता आवाज-जोपासना मदत करते. बाह्यसाधन-सामग्रीला तुच्छ मानावयाचे नाही, पण त्याच्या आहारीही जायचे नाही, असा आवाज–जोपासनेचा दृष्टिकोण असतो. कृत्रिम परिस्थिती अशी निर्माण करावयाची, की नैसर्गिक आविष्काराची ओढ वाटू लागावी, असे वर्णन सुधारणा–युगाच्या पहिल्या कमाईचे होऊ शकेल! आता कृत्रिम वातावरणात नैसर्गिकतेचा वास व्हावा, तर अधिक साधनसामग्री निर्माण करावी लागते, असा विरोधाभास आहे! या पार्श्वभूमीवर नैसर्गिक बनण्यासाठीही अभ्यास करावा लागतो आणि आवाज-जोपासना ही अभ्यासपद्धती म्हणून महत्त्वाची ठरते.

## संदर्भ


१. John Gielgud, **Stage directions**, London : Mercury Books 1963, p. 14.

२. के. नारायण काळे, **नाट्यविमर्श**, मुंबई : पॉप्युलर, १९६१, पृ. ६५.

३. Richard Findlater, **Six great actors**, London : Hamish Hamilton, I957, p. 166.

४. John Gielgud, 1963, p. 5.



**संशोधन व तौलनिक संगीतशास्त्र विभाग, नॅशनल सेन्टर फॉर द परफॉर्मिंग आर्ट्स, नरिमन पॉइंट, मुंबई ४०० ०२१**

# अनुवादक्रियेची एक भारतीय शोधयात्रा

## विजया देव

" अनुवाद–व्यवहारात अपार आनंद आहे. कारण अनुवादक आणि सरस्वती यांच्यामधील ती देवघेव असते."

उमाशंकर जोशी, २५ ऑक्टोबर, १९८७, त्रिवेंद्रम.

२४ ऑक्टोबर ते १५ नोव्हेंबर या कालावधीत साहित्य अकादमी, नवी दिल्ली यांच्या विद्यमाने त्रिवेंद्रम येथे ललित साहित्याच्या अनुवादावर प्रादेशिक कृतिसत्र आयोजित केले होते. भारताच्या पश्चिम आणि दक्षिण भागातील, म्हणजेच मराठी, गुजराती, कोकणी, सिंधी, तमिळ, तेलुगू, कन्नड, व मलयालम या भाषांतर्फे एकंदर जवळ जवळ पन्नास व्यक्ती यात सहभागी झाल्या. साहित्यकृतींच्या अनुवादाचा थोडाफार अनुभव असलेल्या व्यक्तींशिवाय या प्रत्येक भाषेतील साहित्याचा, साहित्य–परंपरांचा व्यासंग असलेल्या एकेक जाणकार तज्ज्ञाला आमंत्रित केले होते. खेरीज अनुवादाचा दीर्घ अनुभव असलेले ज्येष्ठ अनुवादक, सत्रव्याख्याते यांचाही समावेश या कृतिसत्रात होता. या कृतिसत्राचे संयोजन–प्रमुख डॉ. अय्यप्प पणिकर हे होते. अनुवादातील समस्यांची मांडणी, प्रत्यक्ष अनुवाद करणे, सैद्धांतिक चर्चा यांना हे तीन आठवडे अखंडपणे वाहिलेले होते. एकंदर अनुवाद–व्यवहारात भारतीय भाषांमधील अनुवादाचे काही वेगळे प्रश्न आहेत का, आणि त्यांतून अनुवादाबद्दल भारतीय विचारपद्धती अशी मांडता येते का, यावर सत्राचा भर होता.

अनुवाद करताना येणाऱ्या अडचणी अनेक प्रकारच्या असतात. कधी त्या विशिष्ट साहित्यप्रकारामुळे निर्माण होतात ( उदाहरणार्थ, कवितेचा अनुवाद ) तर कधी मूळ साहित्यकृतीच्या रचनेच्या काळामुळे. प्रस्थान–भाषा (ज्या भाषेतील साहित्यकृतीचा अनुवाद होतो, ती भाषा) व ईप्सित–भाषा (ज्या भाषेत अनुवाद करायचा, ती भाषा) यांच्यांतील भाषिक द्रव्याच्या वेगळेपणामुळे येणाऱ्या समस्यांना तर सततच अनुवादकाला तोंड द्यावे लागते. शिवाय साहित्याला सामाजिक–सांस्कृतिक अंग असते आणि अनुवादकाला ते खरे आव्हान वाटते. या सर्व प्रश्नांची मांडणी व्हावी, विविध भाषांमधील अनुवादकांना एकत्र चर्चेची संधी मिळावी, सैद्धांतिक भूमिकांच्या प्रकाशात अनुवाद व्यवहाराचे मूल्यमापन व्हावे, या गोष्टी येथे साध्य झाल्या, असे म्हणता येईल.

या संदर्भात काही व्याख्यात्यांनी मांडलेले विचार महत्त्वाचे वाटले. त्यांची संक्षिप्त नोंद येथे करणे उययुक्त होईल.

श्री. का. ना. सुब्रमण्यम् हे पन्नास वर्षांचा अनुवाद-लेखनाचा अविरत अनुभव असलेले ज्ञानवृद्ध साहित्यिक. १९३६ मध्ये त्यांची पहिली अनुवादित कथा प्रसिद्ध झाली. ते या कृतिसत्रात तमिळ भाषेतील जाणकार व्यक्ती म्हणून आले होते व सर्व वेळ सर्व घडामोडींमध्ये समरस होत होते. त्यांच्या मते अनुवादासाठी पुस्तक निवडणे हे साहित्य-प्रेमाचे निदर्शक असते. तसेच विशिष्ट पुस्तकाची निवड ही एकप्रकारे समीक्षाकृतीच असते. कधी कधी संपूर्ण संहितेच्या अनुवादाऐवजी संक्षिप्त अनुवाद करणे श्रेयस्कर असते. मूल साहित्यकृतीबद्दल अनुवादकाला प्रेम असेल, तर अनुवादही सरस ठरतो. अनुवादात मूलकृतींशी प्रामाणिक राहणे व वाचनीयता टिकवणे यांची सतत सांगड घालावी लागते. कधी कधी प्रस्थानभाषेच्या तुलनेत ईप्सित भाषा अपुरी वाटू लागते. प्रत्येक भाषेत आविष्काराच्या दृष्टीने काही मर्यादा असतातच. या भाषिक मर्यादांची जाणीव भाषांतर करताना होते. अनुवादासाठी साहित्याची निवड करताना भारतीय साहित्याची अवस्था आणि वाचकांची आवडनिवड या गोष्टी विचारात घ्याव्या, असे त्यांचे म्हणणे होते. शेवटी, कोणताही अनुवाद परिपूर्ण नसतो; मूलकृतीच्या तो फक्त जवळपास पोहोचू शकतो ( पन्नास ते नव्याण्णव टक्के ), असे ते म्हणाले.

प्रा. यू. आर्. अनंतमूर्ती (कोट्टयम् येथील गांधीजी विद्यापीठाचे कुलगुरू आणि कन्नड कादंबरीकार) यांच्या व्याख्यानाचा भर कादंबरीच्या अनुवादावर अधिक होता. कादंबरी ही पत्रकारिता आणि काव्य यांची संतती आहे. वास्तवनिष्ठा आणि भावानुभव-निष्ठा यांची सांगड कादंबरीत असल्यामुळे तो एक जिवंत, 'चल' वाङ्मयप्रकार आहे. त्यात निवेदनाला प्राधान्य असते. अनुवादकाला मूलकृतीशी प्रामाणिक राहूनही कादंबरीच्या अनुवादात स्वातंत्र्य घेता येते असे त्यांचे मत होते. (त्यांच्या या मताला प्रा. वेलायुधन यांच्या अनुभवकथनामुळे पुष्टी मिळाली.) ज्या भाषेतील साहित्य पुरेसे 'घेणारे' असते, तेच 'देणारे'ही भूमिका घेतल्यानेच बजावायला समर्थ ठरते. इतर साहित्यांबाबत स्वागतशील भूमिका घेतल्यानेच आपले साहित्य पुष्ट आणि इतरांना पोषक बनू शकते. ललित साहित्याचा अनुवाद हा संस्कृतींच्या देवाण-घेवाणीचा राजमार्ग आहे. **अग्निसाक्षी**च्या तोडीच्या कादंबऱ्यांचा इतर भारतीय भाषांमध्ये अनुवाद झाला, तर तौलनिक भारतीय साहित्यअभ्यासाचा तो चांगला विषय ठरेल. असे विविध मुद्दे त्यांच्या भाषणात होते. (**अग्निसाक्षी**- लेखिका ललितांबिका अंतर्जनम् या मलयालम् कादंबरीचा मराठी अनुवाद सौ. धनश्री हळबे यांनी केला आहे.)

मूलकृतीशी निष्ठा आणि अनुवादक घेत असलेले स्वातंत्र्य ( fidelity and freedom ) हे संकल्पनायुग्म वारंवार चर्चेत येत होते. या दोन शब्दसंहतींऐवजी 'जबाबदारी' ( responsibility ) हा शब्द डॉ. के. व्ही. तिरुमलेश (केंद्रीय इंग्रजी व विदेशी भाषा संस्थान, हैदराबाद ) यांनी सुचवला. अनुवाद-व्यवहार ही एक जबाबदार कृती आहे, असे मानले की वरील दोन्ही गोष्टींचा अंतर्भाव त्यात होतोच. साहित्याला

सांस्कृतिक अंग असल्यामुळे, संस्कृति-विशिष्ट शब्दसंहती भाषेत रूढ असतात. ( उदा. औक्षण किंवा bullfight). अशा वेळी ईप्सित-भाषेतील वाचकांच्या कल्पनाशक्तीवर काही अंशी भिस्त ठेवावी. कल्पक वाचकापुढे साहित्यातील आशय प्रतिमित होऊन उलगडत जातो. अनुभवाची पुनर्निर्मिती तो कल्पनेत करतो, असे त्यांनी सांगितले. अनुवादित साहित्याचे ईप्सित भाषेतील साहित्यात स्थान काय, याचा विचार त्यांनी केला. अनुवादित साहित्य हे 'साहित्य-३' असते. आपल्या भाषेतील मूलसाहित्य हे 'साहित्य-१'; इतर भाषांमधील मूल साहित्यकृती हे 'साहित्य-२'; आणि त्या त्या भाषेमधील अनुवादित कृती हे 'साहित्य-३' अशी वर्गवारी त्यांना अभिप्रेत होती. जे अनुवादित साहित्य कालांतराने, त्याच्या मूल्यभावानुसार, ईप्सित भाषेतील साहित्याचाच एक भाग बनते, तेव्हा ते साहित्य-१ या गटात येते. म्हणजेच साहित्य-३ हे नेहमीच साहित्य-३ राहात नाही. त्यांच्या मते अनुवादामागे आणखी एक प्रेरणा असते. ती म्हणजे आपल्या भाषेआधी दुसऱ्या भाषेतील साहित्यात काही नावीन्यपूर्ण निर्मिती होते, की काय, ही भीती व त्या निर्मितीची ओढ. ( Fear and Fascination of the other ). जे नवीन, ते आपल्या भाषेत प्रथम निर्माण व्हावे, असे याला वाटते. त्या जाणिवेतूनही अनुवादित कृती निर्माण होतात.

आपल्या भाषांमधील अनुवाद-व्यवहारात प्रस्थान भाषा म्हणून इंग्रजीचे स्थान मोठे आहे. या संदर्भात डॉ. शांतिनाथ देसाई (शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर) यांचा मुद्दा विचारार्ह वाटला. भाषांतरामार्फत होणारी देवाणघेवाण दोन समान संस्कृतींमध्ये होते, तशीच दोन असमान संस्कृतींमध्येही होते. इंग्लिशमधून इतर भारतीय भाषांमध्ये होणारे अनुवाद हे आजमितीला असमान व्यवहाराचे निदर्शक आहेत. ही परिस्थिती बदलण्याची वेळ आलेली असून उलट भाषांतरेही तितक्याच जोमाने व गतीने व्हायला हवी आहेत, असे त्यांनी सांगितले.

कोणत्याही भाषेतील साहित्यव्यवस्थेत अनुवादित कृतींना एक स्वतंत्र स्थान असते. डॉ. शिवेंद्रकिशोर वर्मा (इंग्लिश व विदेशी भाषा संस्थान, हैदराबाद) यांनी या अनुवादांसाठी 'पाठ्यांतर' (allotext) अशी संज्ञा वापरली. अनुवाद म्हणजे भाषिक, सांस्कृतिक, आशयजन्य दबावांमुळे निर्माण होणारे 'पाठ्यांतर' असते, असे त्यांचे मत आहे.

व्याख्यात्यांनी मांडलेल्या या विचारांखेरीज अनेक मुद्दे दिवसभरात चर्चेला येत होते. त्यांतील एक म्हणजे, 'आपल्या अनुवादव्यवहारात इंग्रजीचे स्थान.' आपले भारतीय भाषांमधील अनुवाद बरेचदा इंग्रजीमार्फत होतात. मूल साहित्यकृती कोणत्याही भारतीय भाषेतील असली, तरी तिचे इंग्रजी भाषांतर हे प्रस्थानपाठ्य ठरते व त्यावरून दुसऱ्या ईप्सित भारतीय भाषेत ती येते. भारतीय भाषांमधील साहित्यात प्रतिबिंबित झालेले अनुभवविश्व, संस्कृतिसंचित इंग्रजी अनुवादात बरेचसे हरवते, कारण इंग्रजी भाषेमधून

ते आविष्कृत होऊ शकत नाही. अशा इंग्रजी मध्यस्थपाठ्यातून पुन्हा दुसऱ्या एखाद्या भारतीय भाषेत अनुवाद करताना तो मुळाशी कितपत प्रामाणिक असेल, ही शंका येत राहते, याचा अनुभव या कृतिसत्रात आला. तेथे सहभागी व्यक्तींना आपापल्या भाषेत अनुवाद करण्यासाठी म्हणून रवींद्रनाथ ठाकूरांच्या एका बंगाली कवितेचा इंग्रजी अनुवाद देण्यात आला. या इंग्रजी पाठ्यावरून आठ भारतीय भाषांमधली ईप्सित अनुवाद–पाठये तयार झाली. शेवटी, ती एकमेकांशी, इंग्रजी अनुवादाशी आणि मूळ बंगाली कवितेशी ताडून पाहता आपण मुळापासून किती दूर गेलो आहोत, हे जाणवले. रोमँटिक भावस्थिती असलेल्या या कवितेच्या एका अनुवादाचा गाभा तर चक्क उपहासगर्भ, औपरोधिक झाला होता. (या कवितेची अशी परवड झालेली पाहून, एका सहभागी अनुवादकाने पुन्हा अनुवादातील ' अ ' सुद्धा लिहिणार नाही, अशी शपथ घेतली!)

यातील अतिरेक आणि विनोद बाजूला ठेवला, तरी इंग्रजीचे मध्यस्थस्थान नाहीसे व्हायला हवे आणि एका भारतीय भाषेतून दुसरीत तडक अनुवाद व्हायला पाहिजेत, यावर एकमत झाले. मातृभाषेतर एकेका भारतीय भाषेवर प्रभुत्व असणाऱ्या अनुवादकांची फळी निर्माण करणे, भाषा शिकण्यासाठी त्या त्या प्रांतात वर्षभर जाऊन राहण्याची अभ्यासवृत्ती असणे, भाषांतर विभागांची विद्यापीठात निर्मिती अशा विविध सूचना या संदर्भात मांडल्या गेल्या.

इंग्रजी भाषेचे स्थान आणखी एका प्रकारे जाणवते. फ्रेंच, रशियन, स्पॅनिश, इत्यादी भारतीय भाषांमधील साहित्यकृतींचा अनुवाद इंग्रजीत झाला, की इंग्रजीतून त्यांचे अनुवाद भारतीय भाषांमध्ये होतात. या बाबतीत, अनुभवी अनुवादक प्रा. एस. वेलायुधन (रीजनल इन्स्टिट्यूट ऑव्ह इंग्लिश फॉर साउथ इंडिया, बंगळूर) इंग्रजीबाबत पूर्ण समाधानी आहेत. त्यांनी जर्मन, स्पॅनिश, नॉर्वीजियन, जपानी, फ्रेंच या भाषांमधील उत्कृष्ट साहित्यकृतींचा इंग्रजीवरून मलयालम्‌मध्ये अनुवाद केलेला आहे. मूळ भाषांचा अजिबात गंध नसूनही, त्यांना अजिबात अडखळल्यासारखे वाटले नाही; इंग्रजी हीच त्यांनी आपली प्रस्थानभाषा मानलेली आहे. इंग्रजी अनुवाद निवडताना मात्र ते पुरेसा चोखंदळपणा दाखवतात. मूळ भाषेपर्यंत जाता आले, तर उत्तमच. इंग्रजी जाणणे पुरेसे आहे असे तेही समजत नाहीत. त्यांचे म्हणणे असे, की साहित्यकृतीला भाषिक अंग असते; पण आधी ती एक कलाकृती असते. म्हणून अनुवादकाला साहित्याची समज असणे अधिक महत्त्वाचे. साहित्यकृतीचे सामाजिक सांस्कृतिक अंग, तिचे कलारूप जाणून घेणे हे अनुवादकाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहे.

भारतीय भाषांमधील साहित्यकृतीचा इंग्रजी अनुवाद कोणत्या ईप्सित वाचकवर्गासाठी आहे, यावरूनही इंग्रजी अनुवादाचे रूप ठरते. उदा. तमिळ कादंबरीचा अनुवाद भारतीय वाचकांसाठी असेल, तर त्यातील इंग्रजी भाषा वेगळी आणि इंग्रजी ही निजभाषा असणाऱ्या अभारतीयांसाठी तो अनुवाद असेल, तर त्यातील भाषाप्रयोग निराळा,

अर्थात या मुद्द्यावर पुष्कळ काही सांगण्याजोगे आहे. पण त्याची सविस्तर चर्चा येथे शक्य नाही.

अनुवाद म्हणजे एका वाचकाने ईप्सितभाषेत केलेली पुनर्निर्मिती असते. अनुवादक हा एक कल्पक, रसिक वाचक असल्यामुळे अनुवादात तो मूलकृतीचा रचनाबंध आणि त्याला जाणवलेला अर्थबंध ईप्सितभाषेत आणण्याचा प्रयत्न करत असतो. थोडक्यात, मूळ लेखक ईप्सितभाषेत हीच कृती लिहू लागला, तर कशी लिहील, या जाणिवेने तो अनुवाद करतो. त्यामुळे अनुवाद जसाच्या तसा नसतो; यथामूल असण्याच्या प्रयत्नात असतो. म्हणूनच, अनुवादकाला मूळ पाठ्यात कधी थोडी भर घालावी लागते, तर कधी किंचित काटछाट करावी लागते. त्यामुळे आणखी, एक प्रश्न उपस्थित होतो. तो असा, की अनुवाद-व्यवहार एकट्या अनुवादकाचा असावा, की त्यात दुसऱ्या कोणाचे सहकार्य अपेक्षित असावे? (दुसऱ्या कोणाचे म्हणजे मूळ लेखकाचे किंवा प्रस्थानभाषेतील साक्षेपी, संस्कारित वाचकाचे.) प्रा. उमाशंकर जोशी म्हणाले, की शक्य झाल्यास अनुवादकाने कवीच्या सान्निध्यात राहून कवितेचा अनुवाद करावा. कवितेची लय आणि आशय ईप्सित भाषेत येण्यासाठी ते आवश्यक आहे. अनुवाद हा कधीच 'जड' नसतो. मूलकृती ही लेखकाने आपल्या हातांत विश्वासाने सोपवलेली ठेव असते. अनुवादात तिला धक्का पोचू न देता अनुवादक आपल्या अर्थनिर्णयन प्रक्रियेनुसार तिला न्याय देतो. लेखक-अनुवादक सहकार्याचा उल्लेख प्रा. वेलायुधन् यांनीही केला. अनुवाद हा नेहमी ईप्सित भाषेतील वाचकासाठी असतो. तेव्हा ईप्सित भाषेचे द्रव्य, साहित्य-परंपरा आणि वाचक यांचा विचार अनुवादकाला करावा लागतो. त्यानुसार मूल पाठ्यात बदल करावे लागतात. अनुवादक आणि लेखक यांनी एकमेकांचा विश्वास संपादन केलेला असला, तर उभयतांच्या चर्चेनंतर व लेखकाच्या संमतीनेच काटछाट करावी. असा सह-संबंध काही कारणाने शक्य नसेल, तर हे काम अतिशय काळजीपूर्वक करावे लागते. वाचनीयता टिकविण्यासाठी आणि संदर्भ खुलवण्यासाठी असे निर्णय अनुवादकाला घ्यावे लागतात. एवढेच नव्हे, तर काही प्रमाणात तो ईप्सित भाषेला आपल्या प्रतिभेचे लेणेही देत असतो. (प्रा. वेलायुधन् यांनी मलयालम् कवी ओ.एन्. व्ही. कुरूप यांच्या कवितांचा इंग्रजीत अनुवाद केलेला आहे.)

नावांच्या उच्चारांबद्दलही येथे गमतीशीर अनुभव आला. 'कुरूप' या केरळमधील नावाचा उच्चार आपण इतर भाषक जसा करतो, तसा ते करत नाहीत. त्याचा उच्चार 'क्रूप'सारखा होतो. या श्री. क्रूप यांना दिल्लीत अमृता प्रीतम भेटल्या. तेव्हा त्या म्हणाल्या, "क्रूप, तुम्ही इतके 'सुरूप' असून तुम्हांला 'कुरूप' का म्हणतात?" मलयालम् भाषकांनी त्यांचीही एक चूक मनमोकळेपणाने कबूल केली. 'कृपलानी' या नावाचा उच्चार ते बरीच वर्षे 'कृपालिनी' असा करत असत. खुद्द कृपलानींनीच या चुकीची दुरुस्ती केली.

सतत एकवीस दिवसांच्या या चर्चासत्रात विविध भाषांमधील अनुवादकांसोबत राहणे, चर्चा करणे हा एक वेगळा अनुभव होता. फक्त काही काही वेळा एक उणीव भासत होती. सर्व चर्चा सर्व भाषकांसमोर चाललेल्या असल्यामुळे मराठी किंवा गुजराती अनुवादकाला महत्त्वाचे वाटणारे प्रश्न तमिळ किंवा तेलुगू अनुवादकाला गैरलागू वाटत, तर या दक्षिणी भाषांबाबतची चर्चा आम्हांला अगम्य वाटे. तेच निदान काही तास तरी एकेका भाषेला किंवा भाषिक गटाला चर्चेसाठी देण्यात आले असते, तर अधिक खोलात आणि तपशिलात जाऊन चर्चा करता आली असती.

प्रत्यक्ष अनुवाद करण्यावर भर दिला गेला असता व त्यादृष्टीने साहित्याची निवड केली असती, तर हे कृतिसत्र अधिक लाभदायक झाले असते.

या कृतिसत्रात संपर्कभाषा म्हणून इंग्रजीचाच वापर सतत होत होता. पश्चिमी आणि दक्षिणी अशा आठ भाषांचा हा गट असा होता, की तेथे हिंदी ही संपर्कभाषा म्हणून चालणे शक्य नव्हते. तमिळचा तर हिंदीला (आणि संस्कृतला) इतका विरोध की, आजच्या तरुण पिढीतील लेखकाला तमिळ भाषा आविष्कारासाठी अपुरी वाटू लागलेली आहे. इतर भाषांमधून मनमोकळे आदान केल्याशिवाय भाषा समृद्ध होत नाही आणि तमिळ भाषेत संस्कृत आणि हिंदी शब्दांना पूर्ण मज्जाव. त्यामुळे तमिळ लेखक–अनुवादकांची आज कुचंबणा होते.

अनुवादाशी निगडित अशी परिभाषा सर्वभाषांमध्ये समान असावी, म्हणून तेथे वापरण्यात आलेल्या इंग्रजी शब्दांना काही पर्याय सुचवावेसे वाटले. ते असे : वर्कशॉप : कृतिसत्र; पार्टिसिपंट : सहभागी; रिसोर्स पर्सन : जाणकार व्यक्ती; फॅकल्टी लेक्चर : सत्र-व्याख्यान; व्हेटेरन ट्रान्स्लेटर : ज्येष्ठ अनुवादक. सोअर्स लँग्वेज व टार्गेट लँग्वेज यांच्यासाठी डॉ. अशोक रा. केळकर यांनी सुचवलेले 'प्रस्थानभाषा' आणि 'ईप्सितभाषा' हे पर्याय या लेखात वापरले आहेत.

या कृतिसत्रातील काही उणिवांची भरपाई त्रिवेंद्रमच्या हिरव्याकंच निसर्गाने झाली. धोधो कोसळणारा पाऊस, हिरवेगार डुलणारे माड आणि दिवसभरातील चर्चा संपल्यावर एकमेकांना ऐकविलेल्या आपापल्या भाषांमधील कविता (त्यांच्या जमेल तशा इंग्रजी अनुवादासह) यांच्या भरगच्च आठवणी घेऊनच सर्व अनुवादक आपापल्या ईप्सित स्थळी प्रस्थान करते झाले.

६१/१६, एरंडवणे, इन्कमटॅक्स ऑफिसजवळ, पुणे ४११००४

## ' सुळकुंबा आणि पोपटी ' बद्दल थोडेसे

**भाषा आणि जीवन** ५ : २ उन्हाळा १९८७ अंकात मा. ना. आचार्य ' सुळकुंबा आणि पोपटी ' या लेखात कोकणातल्या रहाटाशी निगडित असलेली भाषा, रहाटी बदलल्यामुळे कशी कळत नाहीशी झाली आहे, याची उदाहरणे दिली आहेत. भाषेच्या इतिहास, भूगोलाच्या संबंधांत ती फार उद्‌बोधक आहेत.

लेखातले खास शब्द प्रचारातून जायला एका पिढीचा काळ पुरला. ते प्रचारात होते, तो काळ मात्र बेचाळिसाहून अधिक पिढ्यांचा असला पाहिजे. ते पाचामुखी आले, तो काळ त्याहून अधिक. शेती हा मुख्य ' धंदा ', शेतीला विहिरीचे पाणी उपशाने देणे हा तिचा मुख्य आधार. पाणी उपसण्यासाठी रहाट हे विकसित यंत्र...ही सारी सांस्कृतिक प्रगती होत गेली, त्या विशाल कालखंडात ही शब्दांची रोपणी त्या त्या काळातल्या प्रमाणभाषेत झाली. या काळात या यंत्रांच्या घडणीचे जे प्रयोग फसले असतील, त्यांनुसार अनेक शब्द पाणी न मिळालेल्या रोपांसारखे गळूनही गेले असतील. आज आपल्याला त्यांची माहिती नाही.

लेखात नोंदलेले शब्द एका खास वावरातले म्हणजे तसे पारिभाषिकच आहेत. त्यांतले बहुतेक सगळे महाराष्ट्र शब्दकोशात आहेत. तसेच मोल्सवर्थच्या कोशातही आहेत. दोन्ही कोशांत ते जास्तीकरून कोकणात प्रचारात असल्याचे नमूद केले आहे. सुळका, अढी, तुंबा, कणा, पोगा, पागुर ( पागोसा ) यांसारखे शब्द देशावरही शेतकऱ्यांच्या तोंडी असतात. लेखात नोंदलेला महानुभाव साहित्यातला पुरावा या संबंधात महत्त्वाचा आहे. महानुभावांची मराठी मुख्यतः कोकणाबाहेरची पण तिच्यातही ' खैरी ' कोकणातल्या-सारखीच आहे. अडखील म्हणजे अर्धवट खोल अशा अडखल्या विहिरीवर रहाटासाठी उभ्या केलेल्या मेढी खैराच्या. म्हणून त्या यंत्राचे नाव खैरी. परिभाषा, शब्द तयार कर-ण्याची ही सोपी रीत. मेढी खैराच्या का ? तर त्या कामाला या झाडाचे लाकूड अगदी योग्य असते, म्हणून. ' खैरी 'सारखी ' बाभळी ' ही कदाचित कुठे असेल, पण प्रमाणित उपयोग मात्र खैराचा झाला.

सुळकुंबा किंवा सुळखांब हा असाच वर्णनाचा शब्द. सुळखांब म्हणजे फिरणारा खांब. मात्र हे कळण्यासाठी दक्षिणीकोश पहायला हवा. त्यातच कणेकडमधल्या ' कणे 'चा लेखातल्या वर्णनाशी जुळणारा कर्नाटकातला अर्थ सापडेल. मनात अढी न धरता पाहिले, तर अडै या तमिळनाडूतल्या रूपात अढीही पाहायला मिळेल. वाकडे असते, ते वाके, हे मराठीवरून कळते, तसेच वाक्कु म्हणजे वाक या तमिळ शब्दावरूनही कळेल मराठीचे अन् तमिळचे वाकडे थोडेच आहे ?





अनुक्रमणिका

वाकड्याचे असे सरळ आधार यायला लागले, तर आजवर शिकलेल्या व्युत्पत्तींचे मनातले घरही फिरणारच. लेखात म्हटले आहे, "आता हे तुंब, हा मुळात खास संस्कृत शब्द. तुंब म्हणजे भोपळा. रहाटाचे तुंबही भोपळयासारखेच गोल, परंतु चपटे." आता तुंब म्हणजे दुध्याभोपळा, त्याच्यात गोलपणापेक्षा लांबटपणाच जास्ती असतो. तुंब याचा रहाटाच्या भाषेतला अर्थ तरी संस्कृत कोशात नाही.

तो दक्षिणीकोशात सापडतो. तुम्बि म्हणजे टेंभुर्णी हे झाडाचे नाव. तुम्बि या तमिळ नावाचे साधारण सारख्या ध्वनींचे मुक्तभेद विविध दक्षिणी भाषांमध्ये प्रचलित आहेत– ते डायोस्पायरॉस Diospyros या शास्त्रीय नावांच्या प्रजातीतल्या वेगवेगळया झाडांच्या नावांचे आहेत. टेंभुर्णी हे त्यांतलेच एक झाड. तुम्बिलि म्हणजे तेंदू या मराठी नावाचे झाड. याचे लाकूड खूप जड, बळकट, आणि दणकट असले, तरी कापायला किंवा कोरायला सोपे असते, म्हणून गाडीच्या चाकांसाठी आणि कंगव्यांसारख्या दातेरी वस्तूंसाठीसुद्धा त्याचा उपयोग करतात. याचे आणि टेंभुर्णीचेही इंग्रजी नाव एबनी. तेंदूचा रंग मातट लालसर. श्रीलंकेत भरपूर पण महाराष्ट्रात विरळ,अशा काळया तेंदूचा श्रीलंकेत खूप वापर आहे. या साऱ्या माहितीवरून असे दिसेल, की रहाटातल्या दातेरी चाकासाठी तुम्ब या झाडाच्या लाकडाचा उपयोग होतो. त्यावरून तुंब हा शब्द, 'खैरी' शब्द आला, त्या चालीवर आला, संस्कृतवरून नव्हे.

दक्षिणीकोशात या तुम्बिच्या खालीच दुधीभोपळयाच्या अर्थाचा दुसरा तुम्बि शब्दही दिला आहे. रहाटाच्या तुंबात त्याची लक्षणा नाही, हे वर आलेच. ती त्याच्या खालच्या तमिळ शब्दात कशी नेमकी आली आहे, पहा : तुम्बि–क्–कै म्हणजे हत्तीची सोंड : 'दुधी भोपळयासारखा हात !' यात 'गोल परंतु चपटे' वगैरे अढी नाही. देटाकडून उभा केलेल्या दुधीभोपळयातला सोंडेचा आकार, अगदी खालच्या वळणासह त्यात नेमका दिसेल. दुधी भोपळा या मराठी नावातसुद्धा लक्षणा आहेच.

ध्वनीवरून लादलेल्या लक्षणेने माडांगूळसारखा जो शब्द लेखकाला 'मोटा अन्वर्थक' वाटतो, तो 'कामकऱ्यांना कळत नाही.' दोन्ही मराठी कोशांत तो माडागूण, मांडागूल असा दिला आहे. 'झाप खोडाला बारीक धाग्यांनी विणलेल्या ज्या काड्यांनी धरून ठेवतो', त्यांना पाहून संस्कृतावरून आचार्यांना अंगुळांची आठवण माडांगूळ या शब्दामुळे होते; माडागूणवरून त्यांना 'गुण' म्हणजे दोरी आठवते किंवा अगूळ म्हणजे अग्र आठवते. झाप, पोग्या यांसारख्या अवयवशब्दांत माडाचे नाव कुठे येत नाही; माडांगुळातच ते कशामुळे ? नुसत्या ध्वनींवरून समासशब्दाची कल्पना करण्यापेक्षा यांच्या मुळाशी माट्टु, माट्टुग यांसारखे 'वर बांधणे,– ला लावणे, अडकवणे' या अर्थाचे दक्षिणी शब्द आहेत, असे म्हणणे अधिक बरोबर होईल.

खरे पाहता आचार्यांच्या माडांगूळपेक्षा कामकऱ्यांचा चौंगा शब्द अधिक अन्वर्थक (किंवा अनुदर्शक म्हणा) दिसतो. कारण त्याच्यावरून शेवेच्या कड्यांसारख्या वेगळयाच

वस्तूचे दृश्यस्वरूपही नेमके सांगता येते. चौंगाचा एक अर्थ चार अंगुळे असा असला, तरी शेवेच्या कड्यांची गुंतागुंत त्यात प्रत्ययाला येत नाही. त्याचा संबंध कन्नड 'सोगे'शी जास्ती चांगला लागतो. सोगे म्हणजे विविध प्रकारचे माड, ऊस आणि केवडा यांचे वैशिष्ट्यपूर्ण पान. यात माडाचा संबंध आहे, तरी माडाचे नाव न आणता साधारण गुणाच्या वर्णनावर भर आहे. कामकऱ्यांच्या तोंडच्या पागोसा (की पागुसा : पागुटं प्रमाणे?) चा पागोट्याच्या शेल्याच्या टोकाशी लावण्यात लक्षणांचा कालविपर्यास होतो असे वाटते. त्यांच्या पूर्वजनांच्या संस्कृतीत पागुसा आधी आल्या आणि पागुटी त्यांच्यांत कदाचित अजूनही आलेली नाहीत ! तमिळ पागु म्हणजे सुपारी; सुपारीचे लोंबते लोंगर वगैरेंशी ' पाग 'चा संबंध लेखकाला तपासता येईल.

मग ' आपण वरणाची व्युत्पत्ती वरान्नवरून लावतो,' हे कदाचित चुकीचे वाटेल आणि या वालांच्या वरान्नाला ' निकृष्ट प्रतीचे अन्न ' म्हटल्याबद्दल अमळ खेद होईल. संस्कृतचा शब्दही माहीत नसलेल्या स्त्रीशूद्रांनी भुकेची वेळ साजरी करताना कोरडी भाकर ओली करावी, म्हणून ' कोरड्यास ', भाकरतुकडा कालवून खाता यावा म्हणून ' कालवण ' तसे भाताच्या ' वर ' पातळ काही हवे म्हणून ' वरान ' केले, त्याला ' वरान ' असेच साधे पण अन्वर्थक नाव दिले. अनेक पिढ्यांच्या अनुभवांतून तूर-वाल यांसारख्या डाळी या वरानासाठी त्यांनी निवडल्या. संस्कृत हीच सर्व भाषांची जननी मानणाऱ्या शास्त्रीबुवांनी त्याचे वरण असे नाव ठेवले आणि वरान्न हे त्याचे मूळही तयार करून दिले. जाता जाता तुरीचे वर्णन वर्णा म्हणून केले; रूढ शब्दांच्या ध्वनींची फिरवाफिरव करून त्यावरून काहीच्या बाही ' मूळ ' अर्थ काढले, असे झाले आहे हे भाषांचा अनेकविध अभ्यास करूनच आपल्याला कळते. त्यातूनच कळते, की वरान्न हे वरणाचे वर्णन योगायोगाने खरे आहे—भातातली प्रथिनांची उणीव भरून काढणारे ते श्रेष्ठ अन्न आहे; त्याची ' वरान्न ' ही व्युत्पत्ती मात्र निकृष्ट आहे.

**संदर्भ**

दक्षिणी शब्दकोश टी. बरो, आणि एम्. बी. एमनो, **ए द्रविडियन एटिमॉलॉजिकल डिक्शनरी** ऑक्स्फर्ड : क्लॅरेंडन प्रेस, १९६१. या कोशात नोंदींना क्रमांक दिले आहेत. प्रस्तुत संदर्भांत पुढील नोंदी जरूर पाहाव्यात :

| | |
|---|---|
| सुळकुंबा : २२२३, १२१६. | कणेकड : ९८१ |
| अढी : ७३ | वाके : ४३७१ |
| तुंब : २७३३–३४–३५. | माडांगूळ : ३९३६ |
| चौंगा : २३४८ | पागोसा : ३३३३ |

झाडांची माहिती महाराष्ट्र सरकारने (तेव्हाच्या मुंबई सरकारने) १९५०–६० च्या दरम्यान प्रकाशित केलेल्या ' बॉटनी ' विषयक गॅझेटियरच्या तीन-चार भागांमध्ये आहे.

उपलब्ध भाग नाममात्र किमतीला मिळत असतात. महाराष्ट्रातले थोर वनस्पतिशास्त्रज्ञ व महाराष्ट्र विज्ञानवर्धिनीचे संस्थापक चिरस्मृत डॉ. आधारकर यांनी संपादिलेल्या या ग्रंथांमध्ये माहिती ठासून भरलेली आहे. सगळ्या झाडाझुडपांची विविध भाषांतली नावेही त्यात आहेत.

**विश्वनाथ खैरे, ३७४ सिंध हाउसिंग सोसायटी, पुणे ४११ ००७**

## परीक्षणावर नजर

**भाषा आणि जीवन** ५:२ उन्हाळा, १९८७ अंकात माझ्या **'भारतीय मिथ्यांचा मागोवा'** या पुस्तकाचे परीक्षण सविस्तर आले आहे, त्याबद्दल आभारी आहे. मिथ्ये आणि मिथ्यकथा यांच्या अभ्यासाला चालना मिळावी, म्हणून पत्रिकेच्या वाचकांसाठी थोडा खुलासा जरूर आहे.

परीक्षणात मिथ्य आणि मिथ्यकथा यांच्यांतला फरक लक्षात न घेतल्यामुळे बरीच गैर लागू टीका आली आहे. पुस्तकातले जे जे संदर्भ याबाबत परीक्षणात दिले आहेत,त्यांच्या मागचीपुढची वाक्ये पुस्तकातून वाचल्यास वाचकांना याचा प्रत्यय येईल. अनेक ठिकाणी परीक्षकांनी पुस्तकातली वेगवेगळ्या संदर्भांतली वाक्ये आणि वाक्यांश उचलून लेखकाचे मत म्हणून विकृत विधाने उभी केली आहेत. 'लेखक संदर्भ देत नाही' ही परीक्षणातली तक्रार खोटी आहे, हे पुस्तकातल्या टीपांची बारा पाने वाचून वाचकाला कळू शकेल, लेखकाची परभृतवृत्ती वगैरे दाखवताना पुस्तकातला उल्लेख अन्य लेखकाच्या उताऱ्यातला आहे, इतकाही विवेक परीक्षणात दाखवलेला नाही. तमिळ शब्दांच्या अनुषंगाने परीक्षणात आक्षेप घेतले आहेत, ते बालिश आहेत, हे तमिळ न जाणणाऱ्या वाचकांनाही समजू शकेल.

परीक्षणाचे परीक्षण करण्याचा लेखकांचा हेतू नाही. (एरवी, वर दिलेल्या आणि आणखीही सर्व प्रकारांचा परामर्श घेणारा लेख लिहून तयार आहे.) पत्रिकेत येणाऱ्या परीक्षणात असू नये तो, शिस्तीचा अभाव आणि खोटेपणा या लांबलचक आणि उद्‌गारचिन्हांनी भरलेल्या परीक्षणात आहे, तो वाचकांच्या नजरेस यावा, म्हणून एवढाच मजकूर आपण छापावा.

**विश्वनाथ खैरे, ३७४ सिंध हाउसिंग सोसायटी, पुणे ४११ ००७**

## शब्द हवा आहे ना ?

**भाषा आणि जीवन** ५ : ३ पावसाळा, १९८७ च्या अंकातील गौरी देशपांडे यांची 'शब्द हवा आहे' ही साद वाचली, तिला हा प्रतिसाद.

'इंटरेस्टिंग' या शब्दाला मराठी पर्याय म्हणून 'रंजक' हा शब्द वापरलेला वाचनात आला आहे. क्वचित् 'रोचक' असाही शब्द वापरलेला आढळतो. मनोरंजनाला वेगळा

अर्थ असल्याने ‘ मनोरंजक ’ नाही, हे तर निश्चित ! ‘ मजेदार ’ मधेदेखील वेगळीच छटा येते. रंजक/रोचक या शब्दांचा विचार व्हावा. काही वाक्यांतून हे शब्द वापरून पाहू या.

(१) हे यंत्र कशा पद्धतीनं काम करतं, हे पाहणं रंजक आहे.

(२) श्रीयुत क्ष यांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यावर विचार करणं रंजक ठरावं.

(३) ह्या विषयात आपल्याला रुची आहे काय ! ( इंटरेस्टेड्साठी. )

(४) याचा परिणाम काय होतो, हे पाहणं रोचक वाटेल.

(५) न्हाव्याचं पात्र आल्यानंतर गोष्टीची रोचकता वाढली आहे.

संदर्भाला अनुसरून रंजकता, रुची, रोचकता हे शब्दही वापरता येतील.

**माधवी आपटे, इंग्लिश विभाग, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद ४३१ ००४**

[ इंग्लिश भाषेत interest, interested या शब्दांना दुसराही एक अर्थ आहे. त्यासाठी हितसंबंध, आस्था, हितसंबंधी हे शब्द वापरावे लागतील हे लक्षात घ्यावे. —संपादक ]

## इंग्रजी गद्याचा मराठी अवतार

**भाषा आणि जीवन**, वर्ष ३, अंक ३ पावसाळा, १९८५ या अंकात श्री. अशोक रा. केळकर यांनी एका भाषेच्या दुसऱ्या भाषेवर पडणाऱ्या प्रभावाची सोदाहरण चर्चा केली होती. ती चर्चा मुख्यतः हिंदी-मराठीच्या संदर्भात असली, तरी त्यांनी अनुषंगानं मराठीतून इंग्रजीत आदान झालेले दोन शब्द उदाहरणादखल दिले आहेत, त्यांपैकी bummalo हा शब्द मराठीतल्या बोंबीलवरून इंग्रजीत रूढ झाला, ह्या त्यांच्या विधानाला Concise Oxford Dictionary आणि भारतीय व इतर काही आशियाई भाषांनी इंग्रजीला बहाल केलेल्या शब्दांचं भांडार असलेला, Hobson-Jobson हा अद्वितीय शब्दकोश या दोहींत पुष्टी मिळते. पण Pomfret हा इंग्रजी शब्द मराठीतल्या पापलेटवरून आला आहे, या विधानाला मात्र त्या दोन्ही शब्दकोशांत दुजोरा मिळत नाही. तो शब्द Pampanoया पोर्तुगीज शब्दावरून आला आहे, असा त्या दोन्ही शब्दकोशांत निर्वाळा आहे. Pomfret चा Paumphlet असाही एक पर्याय आहे आणि त्यावरून पापलेट हा शब्द मराठीत आला असेल, असं वाटतं.

इंग्रजीतल्या शब्दप्रयोगांच्या आणि वाक्यप्रयोगांच्या मराठीवरच्या प्रभावाची दखल अजून कोणी फारशी घेतलेली दिसत नाही. त्याची काही उदाहरणं खाली देत आहे :

(१) “ माओच्या निधनानंतर गेल्या ११ वर्षांत यांगत्से नदीतून खूप पाणी वाहून गेले. ”

(२) “ गोदावरीबाई [ परुळेकर ] तोंडात चांदीचा चमचा घेऊन जन्मास आल्या.”

(३) " माफी मागितल्यानंतर थोड्याच अवधीत सत्कार स्वीकारण्याइतकी त्यांची [ आमदार गोखल्यांची ] कातडी जाड नव्हती."

(४) " सगळेच संपादक आगरकर–टिळक नसतात, त्यांचेही पाय मातीचे असू शकतात."

(५) " चिपळूणकरांविषयी विद्वानांच्या मतामतांतराचा लंबक पुष्कळच खालीवर होत आला आहे."

(६) " आपल्या हस्तिदंती मनोऱ्यातून ही उच्च विद्याविभूषित मंडळी जमिनीवर येतात आणि आजूबाजूच्या खेड्यांत जातात."

(७) " या नव्या अंदाजपत्रकात...अनेक करविषयक सुधारणांच्या घड्याळाचे काटे मागे फिरवण्यात आले आहेत."

(८) " एस् एम् नंतर ढाकणे महाराष्ट्र जनता पक्षाचे अध्यक्ष झाल्याने पक्षाची प्रतिमा उजळ होईल, असे कोणाला वाटत असेल, तर ते मूर्खांच्या नंदनवनात राहतात, असे म्हणावे लागेल." ( दोन वाक्यप्रयोग )

(९) " अवर्षणामुळे शेतीच्या उत्पादनात घट, त्यामुळे औद्योगिक उत्पादनातही कपात व त्यातून जीवनावश्यक वस्तूंची टंचाई असे दुष्टचक्र निर्माण होण्याची शक्यता आहे."

(१०) " खटल्याची टांगती तलवार डोक्यावर लटकत असतानाही, केसरीने व मराठ्याने शिवाजीराजांच्या दुर्दशेचे वर्णन करण्याचा उपक्रम सुरू ठेवलाच होता."

या उदाहरणांत इंग्रजी प्रयोगांचा अनुवाद कुठं झाला आहे, ते स्पष्ट करण्याची गरज वाटत नाही. या अनुवादांपैकी ग्राह्य कोणता आणि त्याज्य कोणता, याबद्दल सर्वच वाचकांचं एकमत होईल, असा संभव नसला, तरी ज्या ठिकाणी समर्पक मराठी वाक्प्रयोग उपलब्ध आहेत, ते वापरले नाहीत ही बाब सर्वांनाच खेदाची वाटावी. " गोदावरीबाई गर्भश्रीमंत होत्या ", " माफी मागितल्यावर थोड्याच अवधीत सत्कार स्वीकारण्याइतके गोखले निर्ढावलेले नव्हते ", " चिपळूणकरांविषयी विद्वानांच्या मतामतांतराचं पुष्कळच आंदोलन झालं आहे " या वाक्यात त्या त्या लेखकांना अभिप्रेत असलेला अर्थ तितक्याच समर्थपणानं व्यक्त होतो असं मला वाटतं. व्यक्त होत नाही, तो इंग्रजीच्या अनुवादाचा हव्यास.

वर उद्धृत केलेली उदाहरणं ख्यातनाम वृत्तपत्रांतून आणि प्रथितयश लेखकांच्या लिखाणातून, एक छंद म्हणून, अधून मधून, टिपलेली आहेत. मला त्यातलं अमराठीपण फारसं रुचत नसलं, तरी त्या मान्यवरांनी जाणीवपूर्वक स्वीकारलेला भाषाभिवृद्धीचा हा एक अभिनव मार्ग तर नसेल ना, अशी शंका साहजिकच मनात डोकावते, ते काहीही असो, मी इतकंच म्हणेन, की हा माझा चहाचा कप नाही.

**पु. कृ. गर्दे, २२९१, मोदीबाग, पुणे ४११ ०१६**





अनुक्रमणिका

## पुरुषानुसार फिरणारी त्रिके

**पूर्वसंदर्भ** : विशेषणे आणि पुरुष, **भाषा आणि जीवन** २ : ४ दिवाळी १९८४, पृ. ५३; ३ : १ हिवाळा १९८५, पृ. २०

अशाच प्रकारची आणखी काही त्रिके.

१. मी मितभाषी आहे. तू अबोल आहेस. तो घुम्या आहे.

२. मी स्पष्टवक्ता आहे. तू फटकळ आहेस. तो तोंडाळ आहे/त्याच्या जिभेला काही हाड ?

३. माझी मुलगी गहूवर्णी आहे. तुझी मुलगी सावळी आहे. त्याची मुलगी काळी आहे.

४. मला वाचनाची आवड आहे. तुला वाचनाचे वेड आहे. तो पुस्तकातला किडा आहे.

प्रेषक : **१–४ गीता सुभाष भागवत, नागपूर, २ मिलिंद रानडे, औरंगाबाद**

## अनुवादावर एक नजर

**भाषा आणि जीवन** दिवाळी १९८७ च्या अंकातील अबू एब्रहम यांच्या भाषांतरित लेखाच्या संदर्भात मला दोन मुद्दे मांडावयाचे आहेत.

१ ) या लेखात एब्रहम यांनी उदाहरणादाखल चार इंग्रजी वाक्ये उद्धृत केली आहेत. ( पृ. ३०, ३१, ३२ ) भाषांतरकर्त्यांनी मुख्य मजकुरात त्या चार वाक्यांचीही भाषांतरे दिली असून कंसात इंग्रजी वाक्ये दिली आहेत. एब्रहम यांचे विवेचन उद्धृत केलेल्या इंग्रजी वाक्यांबद्दल आहे, त्यांच्या भाषांतराबद्दल नाही, हे लक्षात घेता मुख्य मजकुरात इंग्रजी वाक्ये आणि त्यांची भाषांतरे कंसात किंवा तळटीपेत यायला हवी होती असे वाटते. एखाद्या विशिष्ट भाषेतील प्रयोगाची चर्चा करणाऱ्या मजकुराच्या भाषांतरात हा प्रश्न नेहमीच उद्भवतो. म्हणून आपले याकडे लक्ष वेधावेसे वाटले.

२) पृ. ३२ वर सुरवातीला एब्रहम यांनी उद्धृत केलेल्या इंग्रजी वाक्यातील dissolve या शब्दाला एब्रहम यांचा आक्षेप असावा असे दिसते. भाषांतरकर्त्यांनी त्या शब्दाचे भाषांतर करताना ‘ विरघळून ’चा वापर करून (आणि आपण तो शब्द जाड ठशात छापून ) एब्रहम यांचा आक्षेप अधोरेखित केला आहे. परंतु चित्रपट-युगामध्ये dissolve चा अर्थ वेगळा होऊ शकतो आणि लेखकाला चित्रपट संपादनातील एक तंत्र याच अर्थाने तो शब्द अभिप्रेत असावा असे वाटते. तसे असल्यास dissolve या शब्दाला आक्षेप घेणे कितपत योग्य ठरेल ?

**प्र. ना. परांजपे, पुणे**

[ **मूळ संदर्भ असा आहे** : dissolve into a solid understanding **विरघळून त्याचे... सघन आकलन.** )

## अपिहितः पिहितश्च

वाङ्मयात शब्द आणि त्यांचा अर्थ यांचे नाते कसे असावे याबद्दल एका रसिक संस्कृत कवीने एक गमतीदार श्लोक लिहिला आहे. तो म्हणतो :

अर्थो गिरामपिहितः पिहितश्च कश्चित्
सौभाग्यमेति मरहट्टवधूकुचाभः ।
नान्ध्रीपयोधर इवातितरां प्रकाशो
नो गुर्जरीस्तन इवातितरां निगूढः ॥

म्हणजे : वाणीचा अर्थ थोडासा स्पष्ट आणि थोडासा अस्पष्ट असला म्हणजे तो मराठी युवतीच्या उरोजांप्रमाणे फार खुलून दिसतो. आन्ध्रयुवतीच्या पयोधरांप्रमाणे फार उघड किंवा गुर्जरवधूच्या स्तनांप्रमाणे पूर्णपणे झाकलेला अर्थ सुंदर भासत नाही !

या श्लोकाची आठवण झाली ती '**भाषा आणि जीवन**' ५ : २ उन्हाळा १९८७ अंकात शकुंतला फडणीस यांनी 'शब्द आणि अर्थ' नावाचे जे टिपण लिहिले आहे त्यामुळे. त्यातील–शब्द–अर्थ–विपर्यासाचे अधिक स्पष्ट उदाहरण वरील श्लोकाच्या पहिल्या चरणात आहे. इथे कवीने 'पिहित' म्हणजे 'झाकलेला' आणि 'अपिहित' म्हणजे न झाकलेला, उघडा' या अर्थाने हे दोन शब्द वापरले आहेत. खरे म्हणजे अपिहित हे 'अपि + धा' या 'झाकणे' या अर्थाच्या धातूचे रूप आहे. म्हणून 'अपिहित' म्हणजे 'झाकलेला'. पुढे कालौयात 'अ' गळून पडल्याने 'पिहित' म्हणजे झाकलेला असा शब्द रूढ झाला. मग त्याला 'अ' हा नकारात्मक प्रत्यय लावून 'अपिहित' म्हणजे 'न' झाकलेला 'उघडा' असा शब्द तयार केला गेला. म्हणजे 'अपिहित' शब्दाचा अर्थ पूर्णपणे विरुद्ध झाला. 'परोक्ष–अपरोक्ष'मध्ये तसे घडलेले नाही. ते दोन्ही शब्द 'च्या गैरहजेरीत' या एकाच अर्थाने वापरले जातात.

**श्रीधर निमकर, मिठीबाई महाविद्यालय, विले–पारले पश्चिम, मुंबई ४०००५६.**

## डोके–सुलटे आणि उफराटे

मेंदू हे काही विचार करण्याचे इंद्रिय नाही, ते आहे जीवनात तगून राहण्यासाठीचे इंद्रिय— पंजे किंवा सुळे यांच्याप्रमाणे. ते असे घडवले आहे, की फायद्याचे सत्य असेल, तेवढेच आपण पत्करावे. आता असतात असे अपवादात्मक प्राणी, जवळजवळ रुग्णाईतच म्हणा ना, की जे विचारांच्या पाठोपाठ तर्काच्या दोरीला धरून धावतात. मग त्याचे पर्यवसान काहीही होवो. अशा मंडळींतूनच हुतात्मे, प्रेषित वा वैज्ञानिक निपजतात आणि त्यांचा शेवट सुळावर तरी होतो, नाही तर अध्यासनावर तरी होतो.

**आल्बेर्ट सेन्ट जॉर्जी** (१८९३–हंगेरियन–अमेरिकन रसायनविद्)

# मराठी व्याकरणपरंपरेचे नव्याने परीक्षण

**मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद. लेखक : कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर. पुणे : सुलेखा प्रकाशन, १९८७. १५; २३० पृष्ठे. ६५ रुपये. संदर्भ, संकेत, शुद्धिपत्रक, विषयीसूची यांसह.**

**परीक्षणलेखक : माधव ना. आचार्य**

मराठी साहित्याचे वय लक्षात घेतले, तर मराठी व्याकरण हे वयाने लहानच म्हणायला हवे. मराठी साहित्य नऊशे वर्षांचे, तर मराठी व्याकरण अवघे पावणेदोनशे वर्षांचे. वयांतील या फरका 'ची कारणे अर्थातच सांस्कृतिक आहेत. इंग्रजांचे राज्य येईपर्यंत मराठी ही अभ्यासाची भाषा नव्हती. स्वाभाविकच तिचे व्याकरण रचण्याची आवश्यकता निर्माणच झाली नाही. गेल्या शतकात इंग्रजी राज्याचे आगमन झाले व शाळाखाते निघाल्यामुळे मराठी पुस्तके, कोश, व्याकरणे यांची गरज निर्माण झाली. ही गरज पुरविताना संस्कृत वा इंग्रजी व्याकरणाचा आदर्श ठेवला गेला व मराठी व्याकरणाची रचना करण्यात आली. १८२४ सालचे पंडिती व्याकरण काय किंवा १८३६ दादोबांचे व्याकरण काय, ही एका विशिष्ट शैक्षणिक गरजेतून निर्माण झालेली व्याकरणे आहेत. परंतु या व्याकरणांनी मराठी व्याकरणांची एक परंपरा निर्माण केली. या परंपरेत दादोबांपासूनचे (१८३६) जसे घडणकार आहेत, तसेच कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारखे (१८६५) परीक्षणकारही आहेत. दादोबांनी सुरू केलेली घडणप्रक्रिया ही दामल्यांच्या **शास्त्रीय मराठी व्याकरणाने** (१९११) परिपूर्णतेस नेली. परीक्षणकारांची परंपरा कृष्णशास्त्री चिपळूणकरांपासून सुरू झाली, ती कृष्णशास्त्री अर्जुनवाडकरांच्या प्रस्तुत **वादप्रवाद** ग्रंथाने परिपूर्ण होत आहे. असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

या दोन्ही परंपरांचा हेतू शैक्षणिकच आहे. दादोबा, दामले व कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या ग्रंथांचे शैक्षणिक हेतू आपल्या परिचयाचे आहेत. प्रस्तुत ग्रंथाचा हेतूही त्याच धर्तीचा आहे. प्रास्ताविकात तो स्पष्ट करताना प्रा. अर्जुनवाडकरांनी, 'मुंबई विद्यापीठात एम्. ए.च्या विद्यार्थ्यांना 'मराठी व्याकरण समस्या' शिकवीत असताना या विषयाच्या सलग सुसूत्र व चिकित्सक ग्रंथांची जाणवलेली उणीव नमूद केली आहे. (पृ. ०८-०९) मात्र एम्. ए. चा अभ्यासक्रम डोळ्यासमोर ठेवून लिहिलेले हे पाठ्य-पुस्तक आहे, असा याचा अर्थ नव्हे. लेखन-प्रेरणा वेगळी; हे लेखन-प्रयोजन वेगळे.

हे प्रयोजन तसे व्यापक आहे. घडणपर आणि परीक्षणपर व्याकरणग्रंथ शास्त्रीय दृष्टि-

कोणातून तपासून त्यांतील व्याकरणदुष्ट भाग काढून टाकणे वा दुरुस्त करणे व पारंपरिक व्याकरणातील प्रमुख विषयांची शास्त्रशुद्ध मांडणी करणे, असे त्याचे सूत्र सांगता येईल.

अर्जुनवाडकरांनी स्वतःच नमूद केल्याप्रमाणे त्यांचा पिंड संस्कृत शास्त्रीय वाङ्मयाने पोसलेला आहे. म्हणूनच आपल्या ग्रंथाच्या नावाविषयी स्पष्टीकरण देताना प्रास्ताविकात ते लिहितात, " जशी न्यायालयात, तशी शास्त्रातही प्रतिपादनाची काही शिस्त असते. प्रमाणपुरःसर प्रमेयांचं प्रतिपादन म्हणजे शास्त्र. त्यामुळं प्रमाणपुरःसर केलेलं प्रतिपादन हेच शास्त्रात ' मत ' या संज्ञेला पात्र ठरतं. अशी अन्योन्यविरोधी मतं येतील, तिथं ' वाद ' असतो. ज्या प्रतिपादनाला प्रमाणाचा आधार नाही तिथं ते शास्त्राच्या दृष्टीनं 'मत'च ठरत नाही. त्याच्या आधारानं केलेला विरोध हा ' वाद ' कसा म्हणावा ? तो केवळ ' प्रवाद ' (=अफवा) होय. मराठी व्याकरणाच्या परंपरेत ' वाद ' आहेत, तसे ' प्रवाद ' ही आहेत. त्या दोहोंचाही परामर्श या ग्रंथात करायचा आहे. " (पृ.०१४–०१५).

या ग्रंथाच्या पहिल्या ' परंपरा ' या प्रकरणामध्ये म्हणूनच अर्जुनवाडकरांनी मराठी-तील महत्त्वाच्या व्याकरणग्रंथांचा चिकित्सापूर्ण परिचय करून दिला आहे. या परिचया-मध्ये भाषाविज्ञानाच्या दृष्टिकोणातून लिहिलेल्या एखाददुसऱ्या व्याकरणग्रंथाचाही समावेश आहे. ' शास्त्राच्या नकाशावर मराठी वाङ्मय ( व्याकरण ) अजून शैशवावस्थेत आहे ', असा त्यांचा निष्कर्ष आहे. ( पृ. ३३ ) याचे कारण म्हणजे, ' मराठी व्याकरणकारांनी संस्कृत व इंग्रजी व्याकरणांशी स्वीकारलेली बांधिलकी ' असे ते ' आदर्श ' या प्रकरणात म्हणतात. ( पृ. ४२ ) अर्थात संस्कृत व इंग्रजीतून व्याकरणाची व्यवस्थासूत्रे घेण्यास त्यांचा विरोध नाही. कारण त्यांनी स्वतःच प्रामुख्याने संस्कृत व्याकरणातील सूत्रांनुसार मराठी व्याकरणातील विषयांची फेरमांडणी केली आहे. ही सर्वच सूत्रे ते प्रथमच नव्याने लक्षात घेत आहेत, असेही मानण्याचे कारण नाही. मराठी व्याकरणाच्या परीक्षणपरंपरेत कृष्णशास्त्री चिपळूणकर, गुंजीकर, राजवाडे, गो. कृ. मोडक, व अरविंद मंगरूळकर यांनी काही सूत्रे देऊन व्याकरणातील काही विषयांची फेरमांडणी केली– सुचविली होतीच. अर्जुनवाडकरांनी त्यांचा योग्य जागी निर्देश केला आहे. त्यांपैकी काहींच्या आधारेच ते पुढे जातात व मराठी व्याकरणाच्या शास्त्रीय मांडणीला पूर्णता देण्याचा प्रयत्न करतात. हे करीत असताना या परीक्षणकारांच्या विचारपद्धतीला ते अनुकरणीय मानीत असले, तरी त्यांची सर्वच मते त्यांनी ग्राह्य मानलेली नाहीत. या संदर्भात त्यांनी एके जागी उद्धृत केलेले ' प्लेटो महान् होता, पण सत्य त्याहून मोठं आहे ' (पृ. ०१०) हे ॲरिस्टॉटलचे वचन लक्षणीय आहे.

अशा सत्याचा शोध घेता घेता जी शास्त्रपूत प्रमाणे त्यांना मिळाली, ती ' व्याकरण ' या प्रकरणाच्या अखेरीस त्यांनी एकत्र दिली आहेत. (पृ. ७७ ते ७९) या प्रमाणांच्या निकषावर त्यांनी पारंपरिक व्याकरण घासून काढले असून त्याची फेरमांडणीही सुचविली

आहे. ग्रंथाची शेष प्रकरणे हे या सोनारकीचे फलित आहे.

'व्याकरण' या शास्त्राची कक्षा निश्चित करताना त्या बाहेरचे जे विषय मिळाले, त्यांचीही चर्चा अर्जुनवाडकरांनी स्वतंत्र प्रकरणे खर्चून केली आहे. त्यामागील त्यांची भूमिका अशी; 'जे विषय वस्तुतः व्याकरणाच्या कक्षेबाहेरचे आहेत (जसे : वर्णमीमांसा, वाक्यपृथक्करण) किंवा तर्कहीन आहेत (जसं : संयुक्त क्रियापद), त्यांचाही परामर्श मी या ग्रंथात केला आहे. मिथ्याज्ञानाचं निराकरण हे सम्यग्ज्ञानाच्या प्रस्थापनेचंच एक अंग आहे, असं शास्त्राचा इतिहास सांगतो. (प्रास्ताविक पृ. ०१५)

पूर्वपरीक्षणकारांनी सुचविलेल्या वाटेने पुढे जाऊन व्याकरणाची शास्त्रशुद्ध फेरमांडणी कशी करता येते, हे प्रस्तुत ग्रंथात अनेक प्रश्नांच्या संदर्भात जाणवते. एकदोन उदाहरणे नोंदतो. शब्दजातिवर्गीकरणात मराठी व्याकरणकारांनी रूप व कार्य या दोन तत्त्वांचे तारतम्य लक्षात न घेतल्यामुळे त्या संदर्भात अनेक समस्या निर्माण झाल्या. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी संस्कृत व्याकरणकारांनी रूपतत्त्व प्रधान मानले. परंतु रूढ आठ शब्द-जातींची व्यवस्था लावण्याच्या खटाटोपात ते तत्त्व शेवटास गेले नाही. परंतु चिपळूण-करांना वर्गीकरणातील पदसिद्धितत्त्व व पदान्वयतत्त्व यांची जाण असावी. उदा., विशेषणा-विषयी ते लिहितात, 'विशेषणे व नामे ही अर्थाच्या दृष्टीने पाहता भेद नाही. एकच आहेत. त्यात जो भेद झाला आहे, तो केवळ भाषेच्या रूढीने झाला आहे. ज्या प्राति-पदिकाचा स्वतंत्रपणे प्रयोग होतो, त्यास नाम म्हणतात व ज्याचा अन्वय दुसऱ्या प्राति-पदिकावर होतो, त्यास विशेषण म्हणतात. जसे : 'आकाशात अनेक गोल फिरतात' येथे गोल शब्दाचा स्वतंत्रपणे प्रयोग असल्यामुळे ते नाम होय; व 'कागदाचा वाटोळा तुकडा आण.' येथे वाटोळा शब्द स्वतंत्र नाही, तुकडा या शब्दाशी अन्वय पावला आहे, म्हणून तो विशेषण होय.' (**मराठी व्याकरणावर निबंध**, आवृत्ती दुसरी, १९७१, पृ. ७१) या विवेचनात सूचित झालेले तत्त्व लक्षात घेऊन अर्जुनवाडकरांनी विशेषणविशेष्य भावाचे यथासांग निर्वहण केले आहे. (पृ. ११९– २२)

दुसरे उदाहरण नामविकरणातील षष्ठीचे घेऊ. चिपळूणकरांनी षष्ठीचे प्रत्यय विशेषणा-त्मक असल्यामुळे तिचे अन्य विभक्तिप्रत्ययांशी वैलक्षण्य सांगून, तिला विभक्तींतून बाद केले. येथे चिपळूणकरांची चूक लक्षात येण्यासाठी अर्जुनवाडकरांना गुंजीकरांची सूचना उपयोगी पडली. अर्जुनवाडकर लिहितात; "प्रश्न असा की षष्ठीच्या ठिकाणी विशेषणाचे धर्म आहेत; म्हणून जे तिला विभक्तीतून उठवू पाहतात, ते ज्या आख्यातात विशेषणांचे धर्म आहेत (ताख्यात, लाख्यात, वाख्यात). त्यांना आख्यातांतून उठवायला तयार आहेत का? असं ते करीत नाहीत...तेव्हा आख्यातात विशेषणाचे धर्म असणं हे जसं त्याच्या आख्यातत्वाला बाधक होत नाही, तसंच षष्ठीत विशेषणाचे धर्म असणं हे तिच्या विभक्ति-त्वाला बाधक होण्याचं कारण नाही. या मुद्द्याकडं आजवर कुणाचंच लक्ष गेलं नाही याचं आश्चर्य वाटतं. एकट्या गुंजीकरांनी अप्रत्यक्षपणानं या मुद्द्याची सूचना केली; पण

प्रतिपक्षाच्या पदरात त्याच्या चुकीचं माप टाकलं नाही. गुंजीकर एवढंच म्हणाले : ' ज्या रूपाला षष्ठी म्हणतात...त्या रूपामध्ये जर विभक्तीचे वास्तविक धर्म आहेत, तर विशेषणाचे धर्मही त्यामध्ये आणखी असले, म्हणून काय झाले ? (गुंजी. ३००) (पृ. १४४-४४)."

पूर्वसूरींनी सूचित केलेल्या वाटेने पुढे जाऊन व्याकरणातील समस्या सोडविण्याचा मार्ग कसा मिळतो, हे या उदाहरणांवरून लक्षात येईल. त्याचप्रमाणे अर्जुनवाडकरांनी प्रास्ताविकात सूचित केलेला प्लेटो–ॲरिस्टॉटलन्यायही जाणवेल. या न्यायाच्या संदर्भात त्यांनी प्रा. अरविंद मंगरूळकरांशी केलेल्या प्रतिवादाचे एक उदाहरण येथेच नोंदू. ' प्रयोजक धातू हे साधित धातू न मानता ते स्वतंत्र मानावेत. ' असे एक रूढिभिन्न मत मंगरूळकरांनी पुनर्विचारात मांडले आहे. (पुनर्मुद्रित आवृत्ती १९७८, (पृ. १६३) त्याचा परामर्श घेताना अर्जुनवाडकर लिहितात; ' पड ' आणि ' पाड ' यांमध्ये काही समान अंश आहे,–ध्वनी आणि अर्थ या दोन्ही दृष्टींनी. त्याकडं जर शास्त्रानं दुर्लक्ष करायचं असेल, तर शास्त्रानं करायचं तरी काय ? हा प्रश्न प्रयोजक रूपांपुरता मर्यादित नाही; व्याकरणाच्या सगळ्याच अंगांत उत्पन्न होण्यासारखा आहे. ' पंच ' म्हणजे पाच, ' अंग ' म्हणजे अवयव; पण ' पंचांग ' म्हणजे कालदर्शिका. मग ' पंचांग ' शब्दाचा ' पंच ' आणि ' अंग ' यांच्याशी संबंध जोडायचा, की नाही ?...वर्णविचारात मंगरूळकर महाप्राण वर्णांचीही फोड (क्+ह्=ख) करू पाहतात. त्यांनी प्रयोजक धातूंचा मूळ धातूंशी संबंध तोडावा, हे अनाकलनीय आहे." (पृ. १५९-१६०)

आजवर न मांडलेली अशी जी मते प्रस्तुत ग्रंथात अर्जुनवाडकरांनी सांगितली आहेत, त्यांचा एकत्र निर्देश करणे योग्य होईल.

१. ' वर्ण ' या प्रकरणात वर्णांचे संयुक्त–असंयुक्तत्व सांगण्यासाठी ते क्रमवर्तित्वाची कसोटी सांगतात. चक्रमधील क्र हे संयुक्त व्यंजन का ? कारण त्यात क् व र् हे क्रमवर्ती वर्ण आहेत, म्हणून (पृ. ९२)

ऋ, ऌ, विसर्ग यांचे वर्णमालेतील स्थाननिर्धारण करण्यासाठी त्यांनी ' व्यर ' व ' स्वंजन ' अशा नवीन संज्ञा बनविल्या आहेत, ' व्यर ' म्हणजे र् ल् मागून येणारा स्वर (ऋ ऌ), ' स्वंजन ' म्हणजे स्वराच्या मागून येणारे व्यंजन (विसर्ग) (पृ. ९८).

२. ' शब्दवर्ग ' प्रकरणात वर्गीकरणाच्या पदसिद्धी (रूपतत्त्व) व पदान्वय (संबंध-तत्त्व) या दोन तत्त्वांचा व्यवच्छेद अर्जुनवाडकरांनी स्पष्ट केला आहे. तदनुसार धातू, नामिक व शेष हे मूलभूत प्रकृतिवर्ग ठरतात (पृ. ११८). कारक, विशेषण, विशेष्य, क्रियाविशेषण हे संबंधवर्ग आहेत. हे स्पष्टीकरण पुढे ' पदान्वय ' या प्रकरणात आले आहे. (पृ. १६३) याच प्रकरणात केवलप्रयोगी अव्ययांची केवळ ' अर्थव्यंजक ' म्हणून नोंद त्यांनी केली आहे. (पृ. १६२) नामिकांतील सर्वनामाचे वेगळेपण पदान्वय तत्त्वानुसार सांगता येते (पृ. २०७). हे स्पष्टीकरण पुढे ' टिपणं ' विभागात दिले आहे.

प्रस्तुत विषयातील अर्जुनवाडकरांची महत्त्वाची भर शब्दयोगींच्या संदर्भातील आहे. शुद्ध शब्दयोगी (च, ही, सुद्धा, देखील, पण, मात्र, ना, की) हीच तेवढी खऱ्या अर्थानं 'शब्दयोगी' ठरतात. उरलेली प्रायः नामिकांपुढे येणारी; व त्यांमुळे मागच्या प्रकृतीचं सामान्यरूप होणारी. त्यांना अर्जुनवाडकरानी 'विभक्तिधर्मी अव्ययं' असे नाव सुचविले आहे. (पृ. १२५) याच संदर्भात त्यांनी अशा शब्दांना दिलेली 'अव्ययीभाव' समास ही उपाधीही नवीन आहे. (पृ. १२४)

३. 'नामविकरण' या प्रकरणामध्ये 'वचन' व 'लिंग' यांचा शास्त्रीय दृष्टिकोनातून विचार केल्यानंतर, 'विभक्ती'मध्ये रूढ विभक्तींची चर्चा केली आहे. प्रथमा, तृतीया, चतुर्थी, षष्ठी व सप्तमी एवढ्या पाच विभक्ती ते मानतात. (पृ. १४८) षष्ठीच्या समर्थनार्थ मांडलेल्या एका मुद्द्याचा उल्लेख वर आलाच आहे. प्रत्ययांच्या चरमत्वाचा षष्ठीला होणारा अडथळा दूर करण्यासाठी ते पुन्हा आख्यात प्रत्ययांतील समान उदाहरण देतात. (पृ. १४४–१४५) हा युक्तिवाद नवीन आहे. संबोधनाच्या 'नो' या प्रत्ययाची त्यांनी सुचविलेली फोड — सामान्यरूप+अ. व. न्. आगम+ओ (हो) (पृ. १४७ १४८)—ही नवीन आहे.

४. 'धातुविकरण' या प्रकरणात ते दामल्यांच्या आख्यातव्यवस्थेस मान्यता देतात. फक्त राजवाड्यांनी सागितलेल्या 'च–आख्याता'ची त्यात त्यांनी भर घातली आहे. (पृ. १५५) शक्य धातूंसंबंधीची दामल्यांची व्युत्पत्ती खोडून काढून त्यांनी नवी व्युत्पत्ती–ऊ कृदन्त + ए (ये) काढू ये→काढवे—सुचविली आहे. (पृ. १५८) प्रयोजकविषयक मंगरूळकरांच्या मताला त्यांनी केलेला विरोध वर निर्दिष्ट झालाच आहे.

५. 'पदान्वय' या प्रकरणात त्यांनी कर्ता व कर्म या संकल्पना रूपतत्त्वाधारे सांगण्याचा केलेला प्रयत्न नवीन आहे. (पृ. १६७) कर्तृस्थानी व कर्मस्थानी अव्ययही कसे येऊ शकते, ह्याचे त्यांनी केलेले विवेचनही नवीन आहे. (पृ. १६७-८)

६. 'वाक्यपृथक्करण' व 'संयुक्त क्रियापद' या अर्जुनवाडकरांच्या मते व्याकरण-बाह्य असणाऱ्या विषयांच्या चर्चेसाठीही दोन स्वतंत्र प्रकरणे त्यांनी खर्च केली आहेत. त्यामागच्या त्यांच्या भूमिकेचा त्यांनी प्रास्ताविकात केलेला निर्देश वर नोंदलाच आहे. वाक्यपृथक्करणाला त्यांनी केलेल्या विरोधाच्या युक्तिवादात व्याकरणशास्त्राच्या संदर्भ-सूत्राचा मुद्दा महत्त्वाचा आहे, (पृ. १७२) 'संयुक्त क्रियापद'ही संकल्पना व्याकरण-बाह्य ठरविण्यासाठी अनेक पूर्वपरीक्षणकारांनी विविध मुद्दे मांडले आहेत. त्यांचे थोडक्यात संकलन करून अर्जुनवाडकरांनी 'संयुक्त क्रियापद मानल्यामुळे वाक्यरचनेतील मूलभूत संकल्पनांना कसा धक्का बसतो', हे मार्मिकपणे दाखवून दिले आहे. (पृ. १८२) संयुक्त क्रियापद न मानल्यास त्यातील कृदन्ताचा व्याकरणदृष्ट्या निर्वाह कसा करावा, याबद्दलचे त्यांचे विवेचनही या विषयाला पूर्णता देणारे आहे. (पृ. १८३-४)

७. 'साधितं' या प्रकरणात समासांची चर्चा येते. समासातील पदप्राधान्याचा अर्थ

विशद करून अव्ययीभावाची नवी व्यवस्था त्यांनी सुचविली आहे. (पृ. १८९)

'उपसंहार' या प्रकरणात अर्जुनवाडकर म्हणतात, 'या सर्व चर्चेचं फलित काय? या चर्चेतून जी तत्त्वं निष्पन्न होतात, त्यांच्या आधारावर मराठीच्या व्याकरणाची नव्यानं मांडणी व्हावी' (पृ. १९२), हे फलित कुणाही अभ्यासकाला स्वागतार्ह वाटेल. अर्जुनवाडकरांनी पूर्ववैयाकरणांची मते तपासताना शास्त्रदत्त प्रमाणशरणता स्वीकारली आहे. ह्याच पद्धतीने आपल्याही मतांचे परीक्षण व्हावे, असे ते सुचवितात. (पृ. १९३)

प्रस्तुत परीक्षणलेखक अर्जुनवाडकरांप्रमाणे शास्त्राच्या सहवासात तयार झालेला वादपटु पंडित नाही. त्यामुळे त्यांचे आव्हान स्वीकारण्याचे धाष्टर्य तो करणार नाही. त्याची भूमिका केवळ जिज्ञासूपणे नवीन ग्रंथाचे हृद्‌गत समजावून घेणाऱ्याची आहे. त्यामुळे त्याला या प्रक्रियेत ज्या अडचणी आल्या, त्यांचा निर्देश एकत्रितपणे करणे युक्त होईल. हा निर्देश करताना क्वचित प्रस्तुत लेखकाला सुचणारे स्पष्टीकरणही नोंदले आहे.

१. वर्णमीमांसा हा विषय व्याकरणाच्या कक्षेबाहेरचा असल्याचे अर्जुनवाडकर सांगतात. (पृ. ८०) परंतु नंतर मराठी वर्णमालेची तपशीलवार चिकित्सा करून स्वतःला मान्य असलेली वर्णमाला देताना, 'ही ५५ वर्णांची माला व्याकरणदृष्टीनं निष्पन्न होते.' असे त्यांनी म्हटले आहे. (पृ. ९८) म्हणजे काय? पुढे 'टिपणं'मध्ये ते म्हणतात, 'तत्त्व हे, की व्याकरण जर शब्द, अर्थ आणि त्यांचा संबंध यांचंसुद्धा ज्ञान गृहीत करतं, तर ते वर्णाचं आणि अक्षरांचं ज्ञान गृहीत करायला कचरेल काय?' (पृ. २००) म्हणजे त्यांना 'व्याकरणदृष्टीनं निष्पन्न' असे म्हणायचे नसून 'व्याकरणासाठी उपलब्ध' असे म्हणायचे असावे.

२. 'संधी व स्वराघात' या प्रकरणाचा भाग प्रायः पूर्ववैयाकरणांची या विषयावरील मते तपासण्यात खर्ची पडला आहे. संधी म्हणजे वर्णविकृती. हा व्याकरणाचा विषय आहे. या विषयावर लिहिताना अर्जुनवाडकरांनी मराठी संधिनियम शोधण्याच्या आवश्यकतेवर भर दिला आहे. (पृ. १०४) त्याविषयी दिग्दर्शन मात्र कोणतेच केलेले नाही. अन्य प्रकरणांतील अशा विषयांच्या दिग्दर्शनामुळे येथे उत्पन्न होणारी अपेक्षा पुरी होत नाही. तोच प्रकार स्वराघाताविषयी. हा विषय व्याकरणात त्यांच्या निकषांना धरून कसा येतो ते हे मांडीत नाहीत.

३. शब्दवर्गांची चर्चा करताना रूढ अव्यये 'शेष' या गटात त्यांनी टाकली आहेत. (पृ. ११८) यांपैकी केवलप्रयोगी ही केवळ अर्थव्यंजक असल्यामुळे गौण अर्थानेच 'शब्द' म्हणून नोंदावी लागतात. (पृ. १६३) उरलेल्या अव्ययांपैकी सामान्यरूपापेक्षी शब्दयोगींचा व्यवच्छेद त्यांनी प्रकृतीमध्ये होणाऱ्या विकृतिरूपाच्या आधारे केला आहे. (पृ. १२४–५) म्हणजे उभयान्वयी व शुद्ध शब्दयोगी हे जुने गट शिल्लक राहतात. कारण क्रियाविशेषणे हा अर्जुनवाडकरांच्या मते संबंधवर्ग आहे. (पृ. १६३) विशेषण–

विशेष्यभाव ही पदान्वयातील एक व्यापक प्रवृत्ती असल्याचे ते सांगतात. (पृ. १६३) नामिकांच्या गटातील विशेषणे व सलिंग आख्यातरूपी क्रियापदे यांचा विशेषणभाव रूप-दृष्ट्या सांगता येतो. परंतु, क्रियाविशेषणे ही विशेषणे म्हणवीत असली तरी, 'ती रूपतः क्रियेची विशेषणं नसतात, अर्थतः असतात.' असे त्यांचे स्पष्टीकरण आहे. (पृ. १६३) पुढे ते म्हणतात; 'ती अर्थतः क्रियापदांशी अन्वित असतात, इतर पदांशी नसतात, एवढ्याच अभिप्रायानं त्यांना क्रियेची विशेषणं म्हणता येईल.' (पृ. २०७) म्हणजे नेमके काय ? तर मग विशेषण हे जेव्हा अविकारी असेल किंवा विकारी असून विशेष्याला अनुसरत नसेल, तेव्हा त्याचे लक्षण कसे काय करावयाचे ? की रूढ व्याकरणातील न्यायशास्त्रीय व्याख्या स्वीकारायची ?

४. नामविकरणातील विभक्तिविचारात त्यांनी द्वितीया, चतुर्थी, षष्ठी, प्रत्ययाभाव द्वितीया, पंचमी व संबोधन या विवाद्य विभक्तींचा विचार प्रामुख्याने केला आहे. रूप हे प्रमाण मानून विभक्ती सांगितल्यानंतर त्यांचे गट त्याच तत्त्वानुसार कसे केले जातात, याचा उलगडा त्यांच्या विवेचनात नाही. याविषयीची संस्कृत व्याकरणाची सूत्रे गो. कृ. मोडकांनी **मराठीचे अंतरंगदर्शन** मध्ये 'द्वितीयावाद' या लेखात (पृ. १८९) दिली आहेत. मंगरूळकरांच्या विवेचनात याच सूत्रांचे अनुसरण आहे. (**पुनर्विचार**, पुनर्मुद्रित आवृत्ती १९७८, पृ. १२२) तेव्हा 'सिद्धपरमतानुवाद' या उक्तीनुसार हे समजून चालायचे आहे, असे तर नव्हे ?

विभक्तिविवेचनाचा एक मुद्दा शब्दवर्गातील शब्दयोगीचर्चेत गुंतलेला आहे. बर्जिस व राजवाडे यांनी मांडलेल्या 'दोनच विभक्ती' या मताला विरोध करताना अर्जुनवाडकरांनी एकपदत्वाची कल्पना स्पष्ट केली आहे. (पृ. २४६-१४७) दोनच विभक्तींची कल्पना, थोड्या वेगळ्या स्वरूपात असेल, परंतु अलीकडे डॉ. ना. गो. कालेलकर व डॉ. अशोक रा. केळकर यांनीही मांडली आहे. (डॉ. केळकरांच्या मते संबोधन ही तिसरी विभक्ती काही रूपांमुळे मानावी लागते, **वैखरी** पृ. २३४) अर्जुनवाडकर शब्दयोगीचर्चेत त्यांच्या मतांचा उल्लेख करतात. (पृ. १२२) डॉ. केळकरांनी विभक्तींची जी चर्चा केली आहे (**वैखरी** पृ. २३३), तीमधील रूढ विभक्तिव्यवस्थेवरील आक्षेप लक्षात घेऊन अर्जुनवाडकरांनी आपली शब्दयोगीची चर्चा केली आहे, हे जाणवते. अर्थात तसा निर्देश सर्वत्र नाही. केळकरांच्या, 'उत्तम मार्ग म्हणजे संस्कृतच्या चौकटीत मराठीला कोंबून बसविण्याचा हा अव्यापारेषु व्यापार सोडून आता...' या मताचा उल्लेख मात्र त्यांनी 'टिपणं'मध्ये केला आहे. (पृ. २१०)

केळकरांचा स्वायत्त-परायत्त भेद अर्जुनवाडकरांना मान्य आहे. त्यामुळे शब्दयोगी हा विभक्तिप्रत्ययांप्रमाणेच परायत्तवर्ग ते मानतात. या परायत्त वर्गामध्ये शब्दयोगींचा विभक्तिप्रत्ययांहून व्यवच्छेद कोणत्या तत्त्वानुसार करावयाचा, हा केळकरांचा पुढचा प्रश्न आहे. त्यासाठी अर्जुनवाडकरांनी, 'शब्दयोगी या वर्गातल्या सर्व शब्दांआधी

विकल्पानं विभक्तिसामान्यरूप किंवा षष्ठ्यन्त सामान्यरूप येतं.' (पृ. १२४) हे भेदतत्त्व सांगितले आहे. केळकरांनी पंचमीच्या प्रत्ययांचे जे वेगळेपण नोंदले आहे, त्याची दखल अर्जुनवाडकरांच्या पंचमीविषयक भूमिकेत घेतली गेली आहे. 'पंचमी ही विभक्ती नाही.' असा त्यांचा निष्कर्ष आहे. (पृ. १२४) 'स, ला, नी, शी, च, त' या सर्व विभक्तिप्रत्ययांमधील एकजिनसीपणा मान्य केला, तरी त्यातील मान्य विभक्तिप्रकारसापेक्ष उपभेद कोणत्या तत्त्वानुसार सांगावयाचे हे येथेही स्पष्ट केलेले नाही.

केळकरांनी या विषयाची वेगळीच मांडणी केली आहे. स्वायत्त-परायत्तऐवजी केळकर मुक्त-बद्ध हे शब्द वापरतात. तदनुसार शब्दयोगी व विभक्तिप्रत्यय यांचा एकत्र विचार करून त्यांनी मुक्त अविकारी, सविकारी व बद्ध अविकारी, सविकारी असे चार वर्ग केले आहेत. (वैखरी पृ. २३२–२३३) ही व्यवस्था लाववाची नाही काय? की हीमुळेही पद–संकल्पना बाधित होते?

५. 'धातुविकरण' या प्रकरणात अर्जुनवाडकरांनी 'शक्य' क्रियापदासंबंधी मंगरूळ-करमताचा परामर्श घेतला आहे. ते दोन्ही क्रियापदे साधितच मानतात. पुढचा प्रश्न ज्या धातूंची ही रूपे सारखीच होतात, त्यांमधील भेदाचा आहे. त्याचे स्पष्टीकरण येथे नाही. ते पुढीलप्रमाणे देता येईल, 'कर' पासून 'करव' हे शक्य–प्रयोजन अंग मिळते. या दोन 'करव' मध्ये भेद असा, की शक्य 'करव' सकर्मक आहे. दोहोंचा वाक्यातील अन्य शब्दांशी येणारा संबंध वेगवेगळा असतो. शिवाय प्रयोजक 'करव'ची तिन्ही पुरुषी रूपे तर शक्य 'करव'ची फक्त तृतीयपुरुषी रूपे मिळतात.

६. पदान्वय या प्रकरणात 'मी पोहू शकतो / जातो, इ.' वाक्यात 'पोहू' हे कर्म सांगून शक, जा' यां सारखे अकर्मक धातू येथे सकर्मक केले आहेत. याच्या समर्थनासाठी ते म्हणतात, '(मी) पोहू म्हणतो', यात 'पोहू' हे गर्भवाक्य.' यातील गर्भवाक्य संकल्पनेचेस्पष्टीकरण त्यांनी दिलेले नाही. '(मी) पोहू म्हणतो, म्हणजे 'मी म्हणतो, मी पोहतो पोहेन/पोहावे' असे काही त्यांना म्हणावयाचे आहे काय? 'पोहू'चे कर्मकारक नामवाक्यात रूपांतर होऊ शकते, असे काही स्पष्टीकरण त्यांना अभिप्रेत असावे.

याच विवेचनात 'त्याला गेलं। जायला पाहिजे' अशीही वाक्ये आली आहेत. गो. कृ. मोडकांनी एका स्वतंत्र लेखात 'पाहिजे'ची चर्चा करून 'गेले'सारखी धातु-साधित विशेषणे कर्तृस्थानी कशी येतात हे दाखविले आहे. (**मराठीचे अंतरंगदर्शन**, पृ. १६९) तेथील युक्तिवादाची या संदर्भात आठवण येते.

७. 'साधितं' या प्रकरणात समासांमधील भेद घटकशब्दांच्या गौणप्रधान भावावरून कसा शोधावा, या संस्कृतातील निकषाचे त्यांनी स्पष्टीकरण दिले आहे. (पृ. १८८–९) अव्ययीभाव हा पूर्वपदार्थप्रधान समास आहे. पारंपरिक व्याकरणात त्याचे लक्षण सांगताना, पूर्वपद बहुधा अव्यय असणे व संपूर्ण सामासिक शब्दही अव्यय असणे यावर भर दिलेला असतो. उदा., पुढील व्याख्या पाहा– "अव्ययीभाव या पूर्वपदार्थ-

प्रधान समासात पूर्वपद हे एखादे अव्यय असून सबंध समास हा क्रियाविशेषणात्मक अव्यय असतो; ( **मराठी : घटना, रचना, परंपरा.** मंगरूळकर, अर्जुनवाडकर. १९५८. पृ. ९५) अर्जुनवाडकरांनी सामान्यरूपापेक्षी शब्दयोगी अव्ययांचा त्यामागील प्रकृति-शब्दांशी होणारा संयोग समास मानून त्याला अव्ययीभाव म्हटले आहे. (पृ. १२४ ) हा विचार नवीन असल्याची नोंद पूर्वी केलीच आहे. सामासिक शब्दांतील पदांच्या प्राधान्याचा जो अर्थ अर्जुनवाडकरांनी स्पष्ट केला आहे, तदनुसार अव्ययीभावाच्या पूर्वपदप्राधान्याचे विवेचन करणे आवश्यक होते. ' त्यावर ' यासारखे समास अव्ययीभाव मानल्यानंतर पूर्वपद अव्यय असणे हे लक्षण सोडून देऊन संपूर्ण सामासिक शब्द अव्यय असणे एवढेच लक्षण मानावे लागते. खरे तसेच आहे. परंतु मराठी व्याकरणात, ' यथाशक्ति, प्रतिदिन ' अशीच उदाहरणे केवळ दिली जात असल्यामुळे लक्षण-विचारात पूर्वपदाचे अव्ययत्वही आले असावे. अव्ययीभावासंबंधी नवीन विचार मांडताना ही सर्व चर्चा येणे आवश्यक होते.

अर्जुनवाडकरांच्या ग्रंथात अशा ज्या स्पष्टीकरणन्यूनता मिळतात, त्या त्यांच्या ग्रंथाच्या उणिवा नव्हेत. काही गोष्टी गृहीत धरल्यामुळे काही वेळा अशी संदिग्धता येते. लाघवाचे जे तत्त्व त्यांनी वारंवार सूचित केले आहे, त्याचाही हा परिणाम असावा.

प्रस्तुत ग्रंथांची बैठक मुळातच वादप्रवादचिकित्सेची आहे. त्यामुळे साहजिकच ग्रंथाचा बव्हंश भाग पूर्ववैयाकरणांच्या मतांचा परामर्श घेण्यात खर्ची पडला आहे. अर्जुनवाडकरांचे ' कण्टकार्जुन ' हे **कण्टकाञ्जलि** मधील टोपणनाव ज्यांच्या परिचयाचे आहे, त्यांना फार तर काही ठिकाणी लाघवाचा विचार सुटला आहे, एवढेच जाणवेल. परंतु **कण्टकार्जुन**मध्ये जसे ' कण्टक ' आहेत, तसा ' अर्जुन 'ही आहे. विनोबांनी म्हटल्या-प्रमाणे, ' जो ऋजु आहे तो अर्जुन.' विषयप्रतिपादनातील तर्कदुष्ट भाग खोडताना ' कण्टकशैली ' ठीक. परंतु त्यातील नव्या सुसंगत भागाचे प्रतिपादन करताना ' अर्जुन-शैली 'च हवी. तशी या ग्रंथात भेटते– पण अधून मधूनच.

लेखनपद्धतीच्या बाबतीत अर्जुनवाडकरांनी एक नवीन मार्ग स्वीकारला आहे. नपुंसक-लिंगी एकारान्त रूपे लिहिताना त्यांनी दीर्घ अकारान्त रूपे लिहिली आहेत. दीर्घत्व दर्शविण्यासाठी त्यांनी त्यावर अनुस्वार दिला आहे. प्रास्ताविकात याबद्दलची आपली भूमिका ते स्पष्ट करतात. (पृ. ०१३) ते म्हणतात त्याप्रमाणे लेखन उच्चारप्रतिरूपक असावे, याविषयी मतभेद व्हावयाचे कारण नाही. प्रश्न दीर्घ अकारासाठी वापरावयाच्या चिन्हाचा आहे. त्यासाठी त्यांनी वापरलेला बिंदु अनुनासिक उच्चार दाखविण्यासाठी वापरला जात असल्यामुळे, काही अपवादात्मक स्थळी लेखनात संदिग्धता येऊ शकेल, हे त्यांना मान्य आहे. यामध्ये आणखी एक घोळ असा, की बिंदुयुक्त अक्षराचा उच्चार दीर्घ-ऐवजी अनुनासिक करण्याकडे प्रवृत्ती दिसते. म्हणजे मात्रा काय किंवा बिंदू काय प्रत्येका-कडे आजच्या परिस्थितीत एकाहून अधिक कार्ये आहेतच. आता त्यांपैकी कुणा एकाकडे

ही कार्ये सोपवावी, हा प्रश्न दीर्घ अकारासाठी स्वतंत्र चिन्ह मिळेपर्यंत कायम राहणार. त्यामुळे कुणी मात्रावादी, तर कुणी बिंदुवादी, तर कुणी आजच्या पद्धतीप्रमाणे द्वैतवादीही असणार. द्वैतच संपवायचे असेल, तर मात्रावादी, अर्जुनवाडकरांच्याच गमतीदार शैलीत असे म्हणू शकेल की, ' मात्रा ही द्विपरिणामात्मक मानावी— ' ए ' व ' दीर्घ अ.' नाही तरी अध्यात्मामध्ये मात्रा द्विपरिणामात्मक आहेच— मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुख-दुःखदा :।' ( गीता २·१४ )

ते काही असो. अर्जुनवाडकरांचा हा ग्रंथ मराठी व्याकरणग्रंथांत फार मोलाचा आहे. दादोबा ते दामले परंपरेला शास्त्रीय बैठक देण्याचे फार महत्त्वाचे काम या ग्रंथाने केले आहे, आणि त्याबद्दल कुणीही अभ्यासक त्यांचा ऋणी राहील, यात शंका नाही.

**चौल, जिल्हा रायगड ४०२२०३**

**परकीयांशी त्यांच्या भाषेत...**

पुरस्कारविजेता अमेरिकन लेखक जॉन शीव्हर रोममधे राहत होता, तेव्हाची गोष्ट. त्याच्या घरी कामाला असलेल्या बाईला फारसं इंग्रजी येत नव्हतं. रोज सकाळी शीव्हरला न्याहारीमधे ती बाई जरा कमी उकडलेलं अंडं देत असे. ते अंडं स्वैंपाकघरात सोलून नंतर टेबलावर आणून ठेवीपर्यंत दगडासारखं थंड होऊन जाई. असा एक आठवडा गेल्यावर शीव्हरनं आपली इटालियन—इंग्लिश डिक्शनरी काढली आणि एक वाक्य करून ते चांगलं पाठ केलं. अतिशय विनम्र शब्दांत तो तिला समजावून सांगणार होता, की आपलं अंडं आपणच सोलून घ्यावं, अशी त्याची इच्छा होती. जेव्हा दुसऱ्या दिवशी सकाळी त्यानं ते वाक्य त्या बाईला म्हटलं, तेव्हा ती रागानं लालबुंद झाली आणि त्याच्या थोबाडीत मारून ती घरातून निघून गेली.

संध्याकाळी ती परतली, तरी रागावलेलीच होती. पण एव्हाना शीव्हरच्या लक्षात आलं आणि तो काय म्हणाला होता, याचा बोध झाला.

तो म्हणाला होता :

" डू नॉट अनड्रेस इन द किचन, यू एग्. "

**रीडर्स डायजेस्ट, सप्टें. १९८७ मधून**
**प्रेषक : माधवी आपटे, औरंगाबाद**

## मराठीतील भाषाविषयक लेखन १९८७

—/ नाट्यगत शब्द : स्वरूप आणि कार्य( अनुष्टुभ् दशकपूर्ती परिसंवाद वृत्तांत )/ अनुष्टुभ् : नाट्यविशेषांक (उत्तरार्ध) (धुळे) जुलै–ऑगस्ट १९८७

—मराठीतील भाषाविषयक लेखन १९८६/ भाषा आणि जीवन ५ : १ हिवाळा १९८७

—मराठीतील भाषाविषयक लेखन १९८१–१९८५ / भाषा आणि जीवन ५ : १ हिवाळा १९८७ / पुरवणी–सूची.

—/ मराठीसाठी प्रायश्चित घ्यावे /(संपादकीय) रविवार सकाळ (पुणे) १९८७·०६·१४. एच्. एस्. सी.च्या परीक्षेला मराठीसाठी एकही पारितोषिक ठेवलेले नव्हते. त्याबद्दल परखड मतप्रदर्शन. या प्रतिक्रियेनंतर तीन दात्यांनी मराठीसाठी प्रत्येकी २०० रु. प्रमाणे तीन पारितोषिके जाहीर केली.

अर्जुनवाडकर कृष्ण श्री. / जोडाक्षरलेखनाचा ‘ शास्त्रीय ’ विचार / नवभारत जाने. १९८७, पृ. २४–३१ तसेच युगवाणी जुऑस १९८७ / पृ. ५२–५९, ६३

अर्जुनवाडकर कृष्ण श्री. / मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद / पुणे : सुलेखा प्रकाशन १९८७ / परीक्षण : मेहेंदळे म. अ. तरुण भारत (पुणे) रविवार १९८७·०९·१३ पृ. ९

आचार्य माधव ना. / सुळकुंबा आणि पोपटी / भाषा आणि जीवन ५ : २ : २२, १९८७

आलासे वीणा / अनुवादकाची कामगत / भाषा आणि जीवन ५ :४ : २०, १९८७ / शंख घोष यांच्या ‘ यमुनावती ’च्या अनुवादाच्या निमित्ताने

आवळीकर पंडित / ‘ कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु / परामर्श ( पुणे ) ऑगस्ट १९८७

आवळीकर पंडित / ‘ भावी ’ नव्हे, भवी ’ / भाषा आणि जीवन ५ : ४ : ४८, १९८७

आवळीकर पंडित, तेलंग विजया / संस्कृत ‘ संभ्रम ’ : मराठी–कन्नड अर्थविभ्रम / भाषा आणि जीवन ५ : ४ : ३९, १९८७

काळे कल्याण / भाषाविज्ञानाचे अध्यापन / समावेश : वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन डॉ. दु. का. संत गौरवग्रंथ / संपा. रत्नाकर बापूराव मंचरकर / कोल्हापूर : सौरभ प्रकाशन, मे १९८७ / पृ. २३२–२५२

काळे कल्याण / शैक्षणिक व्याकरण ( संशोधनाची क्षितिजे ) / साहित्यसूची (पुणे) सप्टें–ऑक्टो १९८७

कुलकर्णी व. दि. / डेथ ऑफ ज्ञानेश्वर (!)/ रसिक दिवाळी अंक, पुणे, १९८७ पृ. १५३.

कुलकर्णी वि. गो. / विज्ञान शिक्षणात भाषेचे स्थान / महाराष्ट्र टाइम्स / रविवार १९८७·११·१५
केळकर अशोक रा. / तोंडी मांडणे (संपादकीय) / भाषा आणि जीवन ५ : २ : १, १९८७
केळकर अशोक रा. / प्रयोगविवेक : पत्ता कसा लिहावा / भाषा आणि जीवन ५ : ३ : ३९, १९८७
केळकर अशोक रा. / संज्ञापन आणि गतिरोधक (संपादकीय) भाषा आणि जीवन / ५ : ४ : १, १९८७
खानोलकर, स. सु. / थोरामोठ्यांचे इंग्रजी : काही किस्से / महाराष्ट्र टाइम्स, रविवार १९८७·०९·०६ पृ. ६
खैरे विश्वनाथ / ‘जोड असर’ / भाषा आणि जीवन ५ : १ : २३, १९८७
गावडे प्र. ल. / इंग्रजी माध्यमाचा अवाजवी अट्टहास / सकाळ (पुणे) १९८७·०६·३०
गावडे प्र. ल. / शिक्षणाच्या माध्यमाने गुणवत्ता वाढते का ? / सकाळ (पुणे) १९८७·०७·०१
गोखले द. न. / भाषाशोधन : भाषिक व्यवहारातील विवेक : लेखांक १, महाराष्ट्र साहित्य पत्रिका (पुणे) एप्रिल–जून १९८७; लेखांक २, जुलै–सप्टेंबर १९८७
ग्लुश्कोवा इरीना / डॉ. तात्याना कातेनिना : एक श्रद्धांजली / भाषा आणि जीवन ५ : ३ : ३५, १९८७ / (मराठी भाषेचा अभ्यासक)
चुनेकर सु. रा. (परीक्षणलेखक) / अभिनव मराठी–मराठी शब्दकोश (लेखक : द. ह. अग्निहोत्री) / भाषा आणि जीवन ५ : १ : २६, १९८७
जोगळेकर गं. ना. / अभिनव भाषाविज्ञान / पुणे : सुविचार प्रकाशन, १९८७
जोशी आणि देशपांडे (संपा.) / मराठी शब्दसागर / मुंबई : भारत बुक डेपो, १९८७.
दाते श्यामला / झोपडपट्टी आणि शालेय मराठी : काही अनुभव, एक सूचना / भाषा आणि जीवन ५ : २ : २८, १९८७
दाभोलकर प्रसन्न / डॉक्टर आणि पेशंट यांचे संज्ञापन / भाषा आणि जीवन ५ : १ : १४, १९८७
देशपांडे दिनकर खंडेराव / ‘प’ वर्ग (गंभीर आणि गमतीदार) / ललित (मुंबई) जुलै १९८७
देशपांडे पु. ल./भाषेचे भावबंधन / महाराष्ट्र टाइम्स, रविवार १९८७·०७·१२ / भाषण, मराठी भाषकसंमेलन, न्यूजर्सी, यू. एस्. ए.
घोंगडे रमेश वा. / साहित्य, दलित साहित्य आणि भाषा / समुचित (नागपूर) जुऑस १९८७

धोंडगे, दिलीप / ' आम्ही दोघे ' : एक शैलीवैज्ञानिक अभ्यास / कविता–रती २ : ४-५ कुसुमाग्रज विशेषांक २ : ८७–९२, मे–ऑगस्ट १९८७

निंबकर जाई / लहान मुलांची भाषा : काही नोंदी / भाषा आणि जीवन ५ : १ : २१, १९८७.

नेमाडे भालचंद्र / ' इराणी ' ह्या कवितेचे भाषाशास्त्रीय विश्लेषण / कविता-रती २ : ६ –३ : १ स ऑ– नोडि १९८७ / अरुण कोलटकरांची कविता, साहित्याची भाषा मध्ये समावेश

नेमाडे भालचंद्र / साहित्याची भाषा / औरंगाबाद : साकेत प्रकाशन, १९८७

परांजपे प्र. ना. / मराठी वृत्तपत्रे आणि इंग्रजीची ताबेदारी ( संपादकीय ) / भाषा आणि जीवन ५ : १ : १, १९८७

पळसुले ग. बा. (परीक्षणलेखक) / पाणिनीय व्याकरण आणि भाषा–तत्त्वज्ञान ( लेखक वा. बा. भागवत) / भाषा आणि जीवन ५ : ४ : ४९, १९८७

पाटील अमृतराव / मराठी भाषेची दुर्दशा / लोकसत्ता रविवार १९८७. ०४.२६ / प्रतिवाद : पाटील, न. ब. / कसली आली आहे दुर्दशा १९८७.०५.०३

पाटील चंद्रकांत / कवितेचा अनुवाद / आलोचना २६ : ३ नोव्हेंबर १९८७ पृ. १–१८

पाध्ये रामदास / बोलविता धनी वेगळाची / शब्दांकन : अपर्णा रामदास / मुंबई : ग्रंथयर, १९८७ / ११६ पृ.

पुजारी आ. गो. / अनुभव–अनुवादांचे / अनुबंध (गुलबर्गा) जाफेमा १९८७

पुंडे दत्तात्रय / न्यायालयात मराठी (संपादकीय ) / भाषा आणि जीवन ५ : २ : १, १९८७

पुंडे दत्तात्रय / लर्निंग मराठी (पुस्तक परीक्षण) / महाराष्ट्र साहित्य पत्रिका (पुणे) जुलै–सप्टेंबर १९८७

प्रधान मधुकर शंकर / बायको आणि भाषा (गंभीर आणि गमतीदार )/ ललित (मुंबई) ऑक्टो. १९८७

फडणीस शकुन्तला / शब्द आणि अर्थ / भाषा आणि जीवन ५ : २ : २६, १९८७

फाटक म. वि; ठकार रजनी / भाषांतर शास्त्र की कला ? / पुणे वरदा बुक्स १९८७ / ८४ पृ.

बर्नसन मॅक्सीन / प्रमाण आणि प्रमाणेतर भाषा : शिक्षकांची भूमिका / भाषा आणि जीवन ५ : २ : ४, १९८७

भागवत वा. बा. / पाणिनीय व्याकरण : परंपरा आणि पद्धती / भाषा आणि जीवन ५ : ३ : ५, १९८७

भिडे वसुधा / लोकाचारातील काही शब्दप्रयोग / भाषा आणि जीवन ५ : ४ : ३३, १९८७

मुंडले आशा / उसनवारीची उसनवारी / भाषा आणि जीवन ५ : १ : २०, १९८७
रणसुभे सूर्यनारायण / सर्जनशीलता आणि वर्णवादी प्रवृत्ती / समुचित (नागपूर) जुऑस १९८७
रहाळकर गो. ह. / विज्ञान–शिक्षणासाठी मराठी माध्यम हवे ! / केसरी, पुणे / रविवार १९८७-०७. १२, पृ. ४
रानडे अशोक दा. / कीर्तन : एक प्रभावी संपर्कक्रिया / नवभारत (वाई) सप्टें.–ऑक्टो. १९८७
वऱ्हाडपांडे नी. र. / भाषांचे वर्गीकरण आणि आर्यांचे मूलस्थान / नवभारत (वाई) जुलै १९८७
शाह रमेशचंद्र / समकालीन वास्तव आणि भाषिक व्यवहार / समुचित (नागपूर) जाफेना १९८७ / हिंदीवरून अनुवादित.
शिरवाडकर वि. वा. / शब्दही विरतात, हरवतात / महाराष्ट्र टाइम्स रविवार १९८७. ०२. २२ पृ. ४

### झुकानेवाला चाहिए

अमेरिकन ग्रंथालयामधून स्वतंत्र संदर्भविभाग असतात. ग्रंथसूची देणारी बांधीव पुस्तके तर आता इतिहासजमा झाली आहेतच, पण आता कार्डकॅटलॉग-पद्धतीला संगणक–पद्धती हा प्रतिस्पर्धी उत्पन्न झालेला आहे. या पद्धतीने ग्रंथाची नोंद अधिक तपशील दाखल करून करता येते– ग्रंथकारनाम, ग्रंथनाम, विषय, दाखल क्रमांक याखेरीज इतरही गोष्टींच्या साहाय्याने नोंद शोधता येते आणि शोधण्यास वेळही फार कमी लागतो. अर्थात् प्रत्येक ग्रंथालयाची गरज खर्चीक ग्रंथसूची- संगणक बसवायलाच पाहिजे इतकी नसते. एका ग्रंथपालाने यावर शक्कल काढली– संगणक न बसवताच आमच्याकडे संगणक-ग्रंथसूची आहे अशी जाहिरात त्याने केली. संदर्भविभागाकडे विचारणांची संख्या खूपच वाढली आणि सेवक वर्गाकडे वाचकमंडळी वाढलेल्या कार्यक्षमतेबद्दल खुषी व्यक्त करू लागली. काम पूर्वीच्याच पण आता आतल्या बाजूस ठेवलेल्या कार्डकॅटलॉगच्या मदतीनेच चालले होते !

**टीना रोज, कम्प्यूटर इंडेक्सिज् व्हर्सस् प्रिंट इंडेक्सिज, लायब्ररी जर्नल १९८७.०९.०१**





अनुक्रमणिका

## लेखकांसाठी सूचना

मुद्रणप्रत हस्तलिखित असो किंवा टंकलिखित असो, पण ती सुवाच्य व पानाच्या एकाच बाजूस असावी. (उदाहरणार्थ सर्व टिंबे ठळक काढावी, खोडलेल्या अक्षरांची दुरुस्ती करताना गिचमीड टाळावी, शाई पसरलेली कार्बनप्रत पाठवू नका.) सर्व पाने सारख्याच आकाराची असावी, पानाचा आकार फूलस्कॅप चतुष्पत्री (८½×६¾ इंच, २१·५×१८·५ सेंटिमीटर) यापेक्षा लहान नसावा, शक्यतो पानाचा आकार फूलस्कॅप द्विपत्री (१३⅓×८½ इंच, ३७×२१·५ सेंटिमीटर) असावा. पाने एकत्र बांधायला टाचणी किंवा क्लिप पुरे, ती पक्की शिवू किंवा स्टेपल करू नयेत. ओळीओळीमध्ये आणि पानाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर असू द्या. थोडक्यात गन्नाळेपण टाकून मुद्रणप्रत तयार करावी, पाठवण्यापूर्वी स्वतः एकदा तपासून पाहावी, आणि संपादक व मुद्रक यांचे काम सोपे करावे.

लेखासोबत चित्रे, आकृत्या, कोष्टके इत्यादी सामग्री द्यायची झाल्यास ती मजकुराच्या पानावर न टाकता स्वतंत्र पानांवर मुद्रणप्रतीच्या शेवटी जोडावी. अर्थात त्यांच्यासोबतचा खुलासेवजा मजकूर, कोष्टकाचा मथळा इत्यादी सामग्रीच्याबरोबरच राहावा. मुख्य मजकुरात योग्य जागी वाचकांच्या आणि मुद्रकांच्या माहितीसाठी कंसात 'चित्र/आकृती, कोष्टक १/२...पाहा' अशी सूचना अवश्य टाकावी.

लेखन टोपणनावाने प्रसिद्ध करायचे असो वा नसो, पण लेखनाच्या शेवटी थोडी जागा सोडून लेखकाने आपले नाव आणि पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता द्यावा. व्यावसायिक पत्ता वेगळा असला, तर तोही नीट द्यावा. नावामधली आद्याक्षरे इंग्रजी लेखनाप्रमाणे न देता मराठी लेखनाप्रमाणे द्यावी. पत्ते पिनकोडसह द्यावे.

निर्णय शक्यतो एक महिन्यात कळवला जाईल. शक्यतो स्वतःजवळ एक जादा प्रत ठेवावी. अस्वीकृत लेखन पुरेसे टपालहशील पाठवल्यास परत केले जाईल. अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा, अशी लेखकांना नम्र विनंती आहे.

लेखाची शब्दमर्यादा ५००० शब्दांपर्यंत ठेवावी. जर तेवढ्या मर्यादेत विषयाला न्याय मिळणार नाही असे वाटले तरच त्या शब्दमर्यादेत बसतील असे दोन किंवा तीन लेखांक पाडून लेख पाठवावा. ही पत्रिका केवळ तज्ज्ञांनी तज्ज्ञांसाठी लिहिलेला मजकूर देणारी पत्रिका नाही हे लक्षात घेऊन लेखाची भाषा शक्यतो सोपी आणि नेमकी ठेवावी. सैद्धांतिक चर्चा असेल तिथे परिचयातील उदाहरणे द्यावी, पारिभाषिक संज्ञा वापरल्या तर त्यांचा अर्थ सोप्या शब्दांत उलगडून द्यावा, केवळ कंसात इंग्रजी प्रतिशब्द देणे पुरेसे मानू नये. (पत्रिकेच्या सर्वच वाचकांना इंग्रजी भाषा येते असे नाही.)

परीक्षणे लिहू इच्छिणाऱ्यांनी संपादकाशी संपर्क साधावा.

पत्रिका केवळ भाषिक प्रश्नांचा कणखरपणाने आणि चिकाटीने सामना करण्यासाठी नाही, तर ती शिवाय भाषाव्यवहारातले लावण्य आणि गंमत यांचा आस्वाद घेण्यासाठी किंवा भाषाव्यवस्थेबद्दलचे निखळ कुतूहल शमवण्यासाठी देखील आहे याचे भान असू द्या. अमुक लेखन पत्रिकेच्या विषयव्याप्तीमध्ये बसेल की नाही याबद्दल शंका असल्यास संपादकांना लिहावे. पानपूरकांसाठी मजकूर पाठवला, तर त्याचे स्वागतच आहे.

लेखनाला आधारभूत असा संदर्भ लेखकाचे किंवा संपादकाचे नाव, शीर्षक, लेखकाच्या जोडीने संपादक किंवा अनुवादक असल्यास त्याचे नाव, उगमस्थळ, प्रकाशन–स्थळ, प्रकाशक, प्रकाशनवर्ष या क्रमाने पुरा द्यावा, म्हणजे जिज्ञासू वाचकांची सोय होईल. एकच संदर्भ पुन्हा द्यायचा झाला, तर कित्ता, तत्रैव इत्यादी शब्दांची योजना न करता अत्रे १९५३ किंवा अत्रे १९५३ : पृ. १३ अशी वापरायला अधिक सोपी पद्धत अनुसरावी.

## चुकीची दुरुस्ती

**भाषा आणि जीवन** ५ : २ : ५२ उन्हाळा १९८७ मध्ये महाराष्ट्र राज्याच्या उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीसाठी द्यायच्या पारितोषिकांच्या योजनेत १९८३–८४ पासून भाषाशास्त्र व व्याकरण हा एक स्वतंत्र विभाग केल्याबद्दल शासनाला धन्यवाद दिला आहे. या संदर्भात श्री. विश्वनाथ खैरे (पुणे) यांनी लक्षात आणून दिले आहे, की असा विभाग निदान १९७३–७४ पासून तरी आहे कारण त्या वर्षी प्रा. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे यांच्या **नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास** (नागपुर : सौ. वसुमती वऱ्हाडपांडे) या पुस्तकाला या विभागात म्हणून पारितोषिक मिळाले होते. (याच्या अगोदर असा विभाग केव्हापासून होता याबद्दल शिक्षण विभागाकडे चौकशी केली पण उत्तर मिळाले नाही.)



अनुक्रमणिका

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्यातरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला ( मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो ) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ ( १९८३ ) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु. ); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. ( आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही. )

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

अनुक्रमणिका

नोंदणी क्रमांक : 040048/83

सस्नेह नमस्कार विशेष विज्ञापना

'भाषा आणि जीवन'

ही तुमची पत्रिका आहे ना ?

ती निर्वेधपणे चालावी असं वाटतं ना ?

तर मग निदान—

१९८८ ची वार्षिक वर्गणी

(स्मरणपत्राची वाट न पाहता)

वेळेवर भरून टाका !

आणि शिवाय

एक तरी नवा सभासद

नवा संस्था-वर्गणीदार

जाहिरातदार

मिळवून द्या !

आणि हो—

पत्रिकेसाठी लिहा पण

(स्मरणपत्राची वाट न पाहता)

निदान पानपूरकं पाठवा

आणि कात्रणं

आणि अनुवाद

आणि उत्तरं

कदाचित् चित्रंही, चित्रांसाठी कल्पना...

पत्रिका आमची थोडीच आहे ?

ती आपली आहे ! परिषद आपण आहोत !

आपले,

पत्रिकेचे संपादक आणि व्यवस्थापन

